उल्हासमाला-पुष्प दुसरें

दंडकारण्यांतील

# रम्य रात्री

रघुनाथ वामन दिघे,
बी. ए., एल्एल्. बी.

---

उल्हास-प्रकाशनगृह
७५९।३९ डेक्कन जिमखाना, पुणें नं. ४

१ ऑगस्ट १९४० ] [ किंमत

# अनुक्रमणिका



---


प्रकाशकः—र. वा. दिघे, बी. ए., एल्एल्. बी.
७५९।३९, उल्हास-प्रकाशनगृह, डेक्कन जिमखाना, पुणें ४

मुद्रकः—स. रा. सरदेसाई, बी.ए., एल्एल्.बी., नवीन समर्थ
विद्यालयाचा ‘ समर्थ भारत ’ छापखाना, ४१ बुधवार, पुणें २

# गनीम : : : : १

" राम राम, चिंतोपंत. "

पुण्याचे कलेक्टर कचेरीचे कांपौंडमध्यें असलेल्या इंपीरिअल बँकेचे पेनशनरांचे खिडकीसमोर पेन्शन घेण्याकरितां जी पेनशनरांची माळ उभी होती तींत मी उभा होतों. मीं मागें वळून पाहिलें तों मला एका वृद्ध गृहस्थानें मिलिटरी पद्धतीचा रामराम केला. तो गृहस्थ काळासांवळा, मध्यम उंचीचा व आडव्या बांध्याचा होता. त्यानें ऐटदार रेशमी कोशा बांधला होता. त्याची शरीरप्रकृति निकोप होती. त्याचें वय साठ-पासष्ट वर्षांचें होतें तरी त्याचे गाल फुगीर राहिले होते, व तो ज्या वेळीं माझे-बरोबर बोलतांना विनयानें हंसला त्या वेळीं ते तुळतुळीत होऊन चमकले. यावरून एवढ्या उतार वयांत देखील त्यानें आपलें आरोग्य राखलें आहे याची ते साक्ष देत आहेत असें मला वाटलें. तो वृद्ध गृहस्थ म्हणजे दुसरा तिसरा कोणी नसून माझा पलटणींतला जिगर दोस्त सुभेदार गावडे होता. त्याचेशिवाय मला चिंतोपंत या नांवानें कोण हांक मारणार ? वास्तविक माझें नांव ' परशुरामपंत ' होतें.

गेल्या लढाईत मेसापोटेमियांत इंग्लिशांची मोहीम सुरू होती त्या वेळीं सुभेदार गावडे व मी कांहीं दिवस एकाच लष्कराबरोबर होतों. मला लढाईची फार भीति वाटे. जिकडे तिकडे लढाईची धामधूम माजून राहिली होती. खेचरांचे खटारे, उंटांचे घोड्यांचे रिसाले, तोफा व मशिनगन्स्च्या गाड्या,

लष्कराच्या हालचाली या सर्वांचे खाड-खाड धाडधाड असे आवाज सारखे होत व ते डोक्यांत खिळ्यांसारखे घुसत. त्यांत जेव्हां तोफांचे गोळे फुटत तेव्हां त्यांचा आवाज अगदीं कांपरें भरवी. कानाशिलांजवळून चुंईऽऽ चुंईऽऽ करीत रायफलींच्या गोळ्या जात तेव्हां तर मी गच्च डोळे मिटून घेई व मला वाटे कीं मी खास मेलों. इतक्यांत कुठें तरी तोफेचा गोळा धाडकन फुटे. त्या धक्क्यानें माझे डोळे आपोआप उघडत व मला बाजूचें जग दिसे. तें पाहून माझ्या जिवांत जीव येऊन मी जिवंत आहें अशी हळूहळू माझी खात्री होत जाई.

मी मिलिटरीचे स्टोअर डिपार्टमेंटमध्यें स्टोअरकीपर होतों. आघाडीवर लढाई चाले त्या ठिकाणापासून आमचा तळ खूप लांब असे. पण अरब लोकांच्या सशस्त्र टोळ्या आमचा स्टोअर लुटण्याकरितां बायकांमुलांसह संधीची वाट पाहत वावरतांना दिसत. त्यामुळें स्टोअरकीपरला फार भीति असे. मला मनांतून अगदीं पश्चात्ताप झाला होता कीं, कुठून आपण मिलिटरींत नोकरी धरली. मी माझ्या जिवाची, हिंदुस्थानांतल्या माझ्या बायकांमुलांची व घरादाराची सारखी चिंता करीं. म्हणून सुभेदार गावड्यानें माझें नांव चिंतोपंत ठेविलें व तो मला त्या नांवानें मुद्दाम चिडवी व आघाडीवरचीं भयप्रद वर्णनें सांगून भेडसावी.

खरें सांगावयाचें म्हणजे माझी भीति अगदींच अस्थानीं नव्हती. कूच करतांना आम्हांला वाटेनें भयाण दृश्यें दिसत. मोठाले उंट कापून त्यांच्या कच्च्या मांसाचा फराळ करीत अरबांचे गांवचे गांव बायकांमुलांसह ताव मारतांना आढळून येत. लढाईमुळें आजूबाजूला इतकें दुर्भिक्ष पडलें होतें कीं अरब आमचे घोडे, उंट व खेचरें पळवून तीं कापून खात. ते लोक जिवावर उदार झाले होते. त्याचप्रमाणें तळहाताला खड्डे नसलेल्या व बैलांच्या खांद्यांप्रमाणें माना असलेल्या कैदी तुर्क सैनिकांच्या टोळ्या जेव्हां आमच्या समोरून जात, तेव्हां आमच्यांतले छातीवर आडव्या फिती लावणारे व बिल्ले लटकविणारे जुने खंदे वीर देखील मनांतून कचरत व शक्तिमापनाच्या नजरेनें त्या तुर्कांकडे बघत. शूर तुर्क, मर्मस्थानाशिवाय शरिराच्या कोणत्याहि भागाला गोळी लागली तर त्याला दाद देत नसत. ते जखमेवर वाळवंटांतली तापलेली वाळू टाकीत, कुडतें फाडून जखम बांधीत व अशा तऱ्हेनें

रायफलींच्या तीन-तीन चार-चार गोळ्या अंगांत ठेवून लढाई चालू ठेवीत. त्यांना पाहून आमच्यांतले शूरांतले शूर देखील कच खात. त्यांचेपुढें माझा काय पाड ?

मी स्टोअरकीपर असल्यामुळें सर्वांनाच माझी गरज लागे व मी पण प्रत्येकाला पाहिजे ती वस्तु पुरवून मदत करीं. कारण लढाईवरील यच्चावत् लोकांत एक प्रकारचा भ्रातृभाव उत्पन्न झाला होता. प्रत्येकाला आयुष्याचा क्षणाचा भरंवसा नव्हता. मी कोणावर उपकार करण्याची संधि आली कीं ती वाया घालवीत नसें. त्यामुळें सर्व बटॅलिअन माझेवर खूष असे. पण सर्वांत गावड्याची माझी फारच मैत्री जमली होती.

गावडे जातीनें महार होता. पण त्याची खरी जात मर्दाची होती. बांका प्रसंग असला म्हणजे या जातीला पहिला मान मिळतो. अशा प्रसंगीं हिंदू-हिंदूंतील जातिभेद नष्ट होतो. पण भीति नाहींशी झाली कीं तो पुनः जिवंत होतो. त्यामुळें ४०६ मराठा पलटणींत व माझ्या बटॅलिअनमध्यें गावड्याचें शौर्य लोक आपसूक वर्णन करीत. पुढें त्याला मर्दुमकीबद्दल व्हिक्टोरिया क्रॉस देखील मिळाला व शिपायाचा तो वाढत वाढत सुभेदार झाला.

एकदां आमचेवर पिछेहाट करण्याचा प्रसंग आला. पिछेहाटीचे वेळीं विशेष शिस्त नसते. गावडे आमचा स्टोअर सांभाळून नेत होता. वाळवंटांतून आम्ही तीस—तीस मैलांची मजल मारीत होतों. प्रत्येकाला पाणी मोजून दिलें होतें. उन्हानें व वाळवंटाचे धगीनें माझे घशाला सारखी कोरड पडे व माझें वॉटर-बॉटलमधलें पाणी मी ताबडतोब संपवून टाकीं. अशा वेळीं कोणी सैनिक दुसऱ्याला एक पाण्याचा थेंब देण्यास तयार होत नसे. समोर अर्ध्या मैलावर यूफ्रेटिस नदी गंगेसारखी दुथडी वाहतांना दिसे. पण आम्हांला तिचे कांठावर जाऊन पाणी घेणें अशक्य होतें. एक तर सैन्य सोडण्याची आम्हाला सक्त मनाई असे व दुसरें कोणी चोरून गेलाच तर तो क्षणार्धांत शत्रूचे गोळीला बळी पडे. अशा वेळीं गावडे आपले मानेंतून वॉटर-बॉटलचा पट्टा काढी व माझे तोंडाला ती लावून फर्लांगा फर्लांगावर मला पाणी देऊन माझा पुनर्जन्म करी. त्या वेळीं

त्याचे तोंडानें उष्टया झालेल्या वाटर-बॉटलमधील उबून कोमट झालेल्या गढूळ पाण्याच्या एका घोटाकरितां मीं गावड्याला माझें अर्धे पेन्शन कापून दिलें असतें.

आणि गावडे हें कशाकरतां करी ? ती तर एक मजेदारच गोष्ट आहे. गावड्याचा व माझा पहिल्या प्रथम परिचय झाला तो असा. एल् एमिरला आमचा मुक्काम होता. आमचे बटॅलिअनमध्यें तीन पंजाबी, एक बलुची, एक गढवाल व दोन शीख आणि बाकीच्या इंग्रजी अशा पलटणी होत्या. गावडे तेथें ॲम्युनिशनचे गाड्यांवर एस्कॉर्ट म्हणून बंदोबस्ताकरितां आला होता. त्या वेळीं तो साधा सैनिक होता. मागाहून तो सुभेदाराच्या हुद्दयापर्यंत चढला होता. तात्पुरता तो आमचे बटॅलिअनला अटॅच झाला होता. कारण पुढें पन्नास मैलांवर त्याची ४०६ मराठा पलटण आम्हांला मिळणार होती. ती पलटण आमचेपासून सोळा मैलांवर कामगिरी करीत आम्हांला समान्तर चालली होती.

ॲम्युनिशन पार्टी आल्यानंतर तीन-चार दिवसांनीं एक दिवस एक सैनिक माझे स्टोअरमध्यें आला व मला सॅल्यूट करून म्हणाला,

" बाबूजी, आप मराठी जानते हो ? आब् मराठे हो ? "

मी स्टॉकबुक लिहीत होतों. मीं डोळे वर करून पाहिलें तों एक पुस्तक किंवा वही यांसारखें कांहींतरी काखोटीला मारून एक शिपाई मला लीनपणें हा प्रश्न विचारीत होता.

" हां जी । आप क्या चाहते हो ? मैं मराठा हूं । "

" वा वा ! देव पावला ! " तो इसम मराठींत बोलला.

मला वाटलें, माझ्याशीं वशिला लावून स्टोअरमधील कांहींतरी जिन्नस मागण्याचा याचा इरादा असावा. मीं पण कायदा मोडून त्याला वाटेल ती गोष्ट दिली असती. कारण मी माझ्या जातभाई मराठ्याचें तोंड सहा महिन्यांत पाहिलें नव्हतें. माझ्या मायबोलीचा त्यानें काढलेला स्पष्ट उच्चार माझ्या कानांत अमृताचे डावाप्रमाणें पडला.

महाराला जातभाई म्हटल्याबद्दल कांहीं सनातनी वाचक माझेवर रागावतील. मी गावड्याचे वॉटर-बॉटलमधील पाणी प्यालों तो आपद्धर्म

म्हणून ते मला शास्त्राधार देऊन कदाचित् शुद्ध करून घेतील; पण महाराला जातभाई म्हणणें म्हणजे केवढें पातक ! पण गावड्याला जातभाई काय, पण सख्खा भाऊ मी म्हणावयास पाहिजे. तें कां, तें मी पुढें ओघाओघानें सांगेन.

लढाईवर आम्हांला जातपात कांहीं नव्हती. महाराष्ट्र सोडल्याबरोबर आमच्या सर्वांच्या जाती नष्ट झाल्या होत्या. पलटणींतील इतर लोक मराठे, ब्राह्मण, प्रभू, महार या सर्वांना मराठे समजत व त्यांना एका विशिष्ट आदरानें वागवीत. याचें कारण मराठ्यांची इतिहासांतील कामगिरी, पलटणींतील शौर्य, स्वच्छता, शिष्टाचार, नीति धर्मयुक्त वागणूक व माणुसकी. खरोखर हिंदुस्थानच्या चारी बाजूंनीं हिंदुस्थानवर संकटें आलीं तर किती बहार होईल ! हिंदुस्थानांतील हिंदूंच्या जातीजातीचा, रोटीबेटीचा, स्पर्शास्पर्शतेचा प्रश्न खाडकन् सुटेल. परकीयांच्या सत्तेखालीं निर्भयता मिळाली व सुखाचा जीव झाला म्हणून, कोणी कोणाला शिवूं नये, उच्च कोण व नीच कोण, कोणीं कोणत्या वेळीं काय खावें, जाती कोणत्या, उपजाती कोणत्या वगैरे गोष्टींना महत्त्व आलें व त्यांतच आम्हां हिंदूंचें डोकें चालूं लागलें.

असो. आतां आपला जातभाई आपल्याजवळ काय वर मागतो व आपण तो वर पुरा करूं शकतों किंवा नाहीं ह्याची वाट पाहत मी बसलों. इतक्यांत गावड्यानें काखोटीचें पंचांग काढलें व माझे टेबलावर उलगडून पसरलें. पुढें तो मोठ्या अदबीनें म्हणाला,

"साहेब, एकादशी केव्हां येते ती कृपा करून सांगा."

मी एकदम सर्दच होऊन गेलों. धन्य आहे लढाईवर धर्म न सोडतां एकादशी पाळणाऱ्या मराठया वीराची. हा खरा भागवतधर्मी वीर. नाहींतर मी. ब्रिटिश रेजिमेंटकरितां आलेल्या सर्व जिनसा, इंटलेपामरचीं बिस्किटें, चीज, हॅम सर्व कांहीं मी पंचांग न पाहतां खात असें. पुढें गावडे महार आहे हें कळलें तेव्हां तर माझा त्याच्याबद्दलचा आदर शतपट वाढला. अंदाजानें दर एकादशीचे आधीं तो मजकडे येई व मला पंचांग दाखवून एकादशी केव्हां पडते तें मजजवळून समजावून घेई. कारण त्याला जरी पलटणींत कामापुरतें हिंदी शिकविलें होतें तरी त्याला पंचांग नीटसें पाहतां येत नसे.

पंचांग पाहतांना त्याचा एकादशीबद्दल नेहमीं घोटाळा उडे. मग त्या लढाईचे घाईत पाण्याचा थेंब न घेतां तो एकादशी पाळी. गावडे जर लढाईवर मारला गेला असता व विष्णुलोक खरा आहे असें धरलें तर विष्णूला स्पेशल विमान गावड्याकरतां पाठवणें भाग होतें. इतकी तो एकादशी कडकडीत रीतीनें करी.

पुढें एल एमिरवर एके रात्रीं एका बाजूनें तुर्क, दुसऱ्या बाजूनें अरब व तिसऱ्या बाजूनें इराणांतील बखत्यारी लोक यांचा हल्ला एकदम आला. चौथ्या बाजूनें शाटेल ॲरबची खाडी आली होती. आम्हांला रिट्रीट करण्याचा एकदम हुकूम सुटला. सर्वजण पळत सुटले. मीहि पळत सुटलों. आम्हांला मागील बेस लाइन गांठावयाची होती. गावडे माझेबरोबर होताच. माझा पाय कांटेरी तारांच्या कुंपणांत अडकला व मला जखमा होऊन त्यांतून रक्त निघूं लागलें. मी माझा जीव घेऊन पळत होतों. पाय तुटून मागें राहिला तरी हरकत नाहीं; मी कुबडी घेऊन चालेन; पण जिवा-निशीं मी कसा सुटणार ? मी धडपड करून पाय ओढूं लागलों तों जास्तच अडकूं लागलों. माणून आरडाओरडा करीत व बंदुकीच्या फेरी झाडीत शत्रु नजीक आले. मी जास्तच धडपड करूं लागलों. गावडे मला माझे कानांशीं तोंड लावून हळू आवाजांत म्हणाला,

"सबूर, घाई करूं नका. मी पाय सोडवून घेतों. तुम्ही मेल्यासारखे पडा. शत्रु स्टोअर लुटून जातील. स्टोअरमधील मालाकरितां हा हल्ला आला आहे."

मला त्याचें म्हणणें समजलें नाहीं. मीं पाय काढण्याचा प्रयत्न केला कीं माझा कोट वरच्या तारेला अडके; कोट सोडविण्याचा प्रयत्न केला कीं विजार अडके. अशा तऱ्हेनें मी पक्का गुरफटून गेलों.

शत्रु अडकावे म्हणून मिलिटरीच्या कुंपणाच्या तारा सैल सोडलेल्या असतात, ही गोष्ट मला त्या वेळीं माहीत नव्हती. त्यामुळें शत्रूंचे ऐवजीं मीच अडकलों गेलों. पंजाबी, शीख, बलुचे सर्व लोक मागील तळावर जाऊन बसले. फक्त गावडे माझेकरितां मागें राहिला. इतक्यांत शत्रु अगदीं हांकेवर आले. रक्तस्रावानें व भीतीनें मी बेशुद्ध पडलों. मग गावड्यानें मेल्याचें सोंग घेतलें. तो हूं कीं चूं न करितां पडून राहिला व त्यानें पडल्या पडल्या हळूहळू मला सोडवून घेतलें. शत्रू स्टोअरची लुटालूट

करण्यांत गुंतले होते. ते त्यांना जें जें मिळेल तें तें यथेच्छ खात होते व पीत होते. ह्या संधीचा फायदा घेऊन गावड्यानें मला हळूहळू तारांचे जाळ्यांतून सोडवून घेतलें व मला पाठीवर टाकून मगर जसा सरपटत सावज घेऊन जातो त्याप्रमाणें तो सरपटत सरपटत शत्रूंचे टप्याचे बाहेर आला. नंतर त्यानें मला पाठकुळी घेतलें व तो पाठीमागील तळावर आला. याप्रमाणें त्यानें मला जीवदान दिलें. मग मी त्याला भाऊ म्हणूं नाहीं तर काय म्हणूं ?

मीं गावड्याला पाहिल्याबरोबर माझी रांगेची माळ सोडली व गावड्याचे दोन्ही हात धरले. त्यानें मला सर्व पेनशनरांचे देखत कडकडून मिठी मारली.

" अरे चिंतोपंत, मला वाटलें तूं म्हाप्रळला वतनवाडी करून राहिलास. पण लेंकरेंबाळें तर खुशाल आहेत ना ? बाईची तब्येत कशी आहे ?"

" हां, सगळे ठीक आहेत. मीं म्हाप्रळ सोडल्याला तीन महिने झाले. मीं पुण्यास बिऱ्हाड केलें आहे. मुलांच्या शिक्षणाची सोय पाहिली पाहिजे ना. यंदा सुशीला इंटरमध्यें आली आहे. तिला कॉलेजच्या वसतिगृहांत ठेवणें व दुसऱ्या चार मुलांना बोर्डिंगमध्यें ठेवणें व येथें बिऱ्हाड करून राहणें दोन्ही मला सारखेंच वाटलें म्हणून मी येथें बिऱ्हाड केलें. पण तूं कां दापोली सोडलीस ? "

" तूं सोडलीस त्याच कारणाकरितां."

मी ऐकतच राहिलों. लढाईवर असतांना गावड्याला मूलबाळ कांहींच नव्हतें, ही गोष्ट मला माहीत होती. मग ह्याला मूल केव्हां झालें? पण शिष्टाचाराला सोडून मला सुभेदाराला तसा प्रश्न विचारवेना. पुष्कळांना म्हातारपणीं देखील मुलें होतात. त्यांतील हा प्रकार असावा असें मला वाटलें.
" चिंतोपंत, माझेमुळें तुझा नंबर गेला. चल, आपण रांगेंत उभे राहूं. मला जरा जाण्याची घाई आहे. "

सुभेदार मला हाताला धरून रांगेंत घेऊन जाऊं लागला. त्यामुळें मनांत आलेला प्रश्न माझे ओंठांवर तसाच राहिला. आम्ही दोघेजण पेनशनचे कागद घेऊन पुन्हां शेवटच्या नंबराला पेन्शनरांच्या रांगेंत जाऊन उभे राहिलों.

ती पहिली तारीख होती. म्हणून त्या दिवशीं कलेक्टर कचेरींत पेनशनरांची गर्दी उडालेली होती. त्यांच्यांत कितीतरी बहुविधता होती. निरनिराळ्या जातींचे, निरनिराळ्या धर्मांचे, निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळ्या खात्यांतून कामें केलेले नोकर लोक आपल्या गुलामगिरीची तपश्चर्या फळाला येऊन म्हतारपणीं सत्तेची अर्धी भाकर आपणास खावयास मिळते आहे या समाधानानें एके ठिकाणीं जमलेले पाहून ब्रिटिश सरकारची धन्य वाटूं लागते. काय पण एकेकांचीं ध्यानें ! कोणी दमेकरी, कोणी खोक्या, कोणी अर्धांगवायूनें लटलट कांपणारा तर कोणी संधिवातानें जखडलेला, कोणी आंधळा तर कोणी पांगळा! याच कां लोकांनीं ब्रिटिश साम्राज्याचा गाडा उरापोटावर ओढला ? आणि त्यामुळें यांची अशी दशा झाली ? त्या दिवशीं कलेक्टर कचेरींत पंगु लोकांची जत्रा भरल्यासारखी दिसत होती. क्लेरिकल्स् म्हणजे टेबलावर बसून कारकुनी केलेले पेन्शनर अगदीं जख्ख होऊन मेटाकुटीला आलेले दिसत होते. मृत्यु त्यांच्या समीप आलेला दिसत होता. त्यांतल्या त्यांत मेंदीनें दाढीमिशी रंगवून आलेले मिलिटरींतले मुसलमान पेनशनर, सर्व्हे डिपार्टमेंटमध्यें चाल पडल्यामुळें पोटरींत बाठे धरलेले पेनशनर, फॉरेस्ट, पोलिस, एक्साइज या डिपार्टमेंटमधील पेन्शनर मात्र दीर्घायुषी व उठावदार दिसत होते. याप्रमाणें निरनिराळ्या खात्यांमधील नोकरीचा प्रत्येक पेन्शनरवर निरनिराळा परिणाम झालेला दिसत होता.

एक गोष्ट मात्र उघड दिसत होती. ती म्हणजे गॅझेटेड ऑफिसर व यःकश्चित् शिपाई एकाच रांगेंत उभे राहून पेनशन घेतांना विषाद मानीत नव्हते. दांत पडून बोळकीं झालेले कितीतरी पेन्शनवाले ऑफिसर्स् दांत पाडलेल्या सापासारखे निरुपद्रवी होऊन तेथें उभे होते. हुद्द्याचे जागेवर असतांना त्यांनीं किती तरी लोकांना कडकडून दंश केले असतील व त्यांच्या घरादारांचीं वाटोळीं केलीं असतील. न्यायाच्या कांट्याला झोका देणारे न्यायाधीश आंधळे होऊन कोणाचें तरी साहाय्य घेऊन तेथें आले होते. बेडर गुन्हेगारांना पकडणारे पोलिस अंमलदार व त्यांना शिक्षा ठोकणारे मॅजिस्ट्रेट कांपऱ्या हातांत पेनशन-रोल घेऊन उभे असलेले पाहून मला त्यांची कींव आली. मी देखील एक वृद्ध पेन्शनरच आहें; आणि स्वजातीची स्वजातीयानें निंदा करावी अशांतला कांहीं माझा उद्देश नाहीं.

पण मला तेथें तीन महिन्यांत जें पाहावयाला मिळालें त्याचें मी हें वाचकां-करितां वर्णन करीत आहें.

माझी सर्व्हिस जरी मिलिटरींत निरनिराळ्या कमान्डस्‌मध्यें झाली असली तरी माझीं नोकरीचीं बरींचशीं वर्षे पुण्यास गेलीं होतीं. पुण्याची हवा मला फार मानवे. शिवाय पुण्यास माझे स्नेही-सोबती पुष्कळ होते. म्हाप्रळ सोडून पुण्यास येण्याचें हें एक दुसरें कारण होतें. या तीन महिन्यांत मला माझे ओळखीचे म्हातारे पेन्शनर किती तरी भेटले. त्यांतले कोणी मला आपल्या बऱ्या न होणाऱ्या रोगाचें वर्णन सांगून त्याची बिनाखी करा-वयास सांगत; तर कोणी मला मुनसफ समजून पेनशनवरून होणाऱ्या घरां-तील भांडणांच्या हकीकती सांगत, किंवा वांटपावरून होणाऱ्या मारा-माऱ्यांचीं वर्णनें करीत; कोणी मला त्यांच्या त्रासिक झालेल्या तिसऱ्या कुटुंबाच्या मनःस्थितीची परीक्षा करावयास सांगत, तर कोणी माझे कानांशीं लागून ओकासाच्या गुणावगुणांची चर्चा करीत. सर्वच पेनशनर वर वर्णन केल्याप्रमाणें नव्हते. त्यांतील कांहीं प्रामाणिकपणा व निःस्पृहता या दोन गुणांमुळें सरकारच्या मर्जीतून उतरलेले व बढतीस मुकलेले होते; तर कांहींना पांढरे केस खरोखरच खुलून दिसत होते. एका पेनशनरबद्दल तर मला फारच कौतुक वाटे. तो माझेआधीं पेनशन घेऊन जाई. मी घरीं परत येतांना तो बुधवारांत नातवंडांकारितां खाऊच्या पुड्या विकत घेतांना दिसे. याप्रमाणें मी पेनशनरांचे ओळींत नित्याप्रमाणें त्यांच्या स्वभावांचें निरीक्षण करीत उभा राहिलों. सुभेदार माझ्या मागोमाग उभा होताच.

आम्ही दोघे पेनशन घेऊन कांपौंडांत नोटा मोजीत उभे राहिलों. इत-क्यांत एक अठरा एकोणीस वर्षांचा गोरापान जवान तरुण एक नवी कोरी सायकल हातांत घेऊन सुभेदारापाशीं येऊन उभा राहिला. त्याचें शरीर भरदार होतें. त्याची कांति तेजस्वी होती. तो अतिशय देखणा होता. तो अतिशय बळकट व चपळ दिसत होता. तो 'राजबिंडा' या पदवीला योग्य होता. त्याचें हास्य सुमधुर होतें. त्याला पाहिल्याबरोबर त्याचेविषयीं माझे मनांत स्नेहभाव उत्पन्न झाला. मला वाटलें, जांवई असावा तर असा.

"हरिश्चंद्र, हे घे पैसे आणि तुला पाहिजे तें फूलपान, फळफळावळ व मेवामिठाई आण." सुभेदार त्याला म्हणाले.

असें म्हणून दहादहाच्या दोन नोटा त्यानें हरिश्चंद्राजवळ दिल्या. मी त्या तरुणाचें सौंदर्य व त्याची वागणूक लक्षपूर्वक पाहत होतों. तो तरुण वागणुकींत अगदीं सभ्य होता. याच्याच का शिक्षणाकरितां सुभेदार पुण्यास आला ? आणि हाच का याचा मुलगा ? उतारवयांत याला मुलगा कसा झाला ? हा एवढा सुंदर कसा ? सुभेदार रंगानें काळा, त्याची बायको गौरू ती देखील काळी असली पाहिजे. मग हा मुलगा इतका गोरा कसा ? हरिश्चंद्र सायकलीवर बसून जावयास निघाला तरी माझी दृष्टी त्याच्या आकृतीचा ठाव घेण्याकरितां त्याचे मागोमाग चालली होती. सुभेदाराच्या लक्षांत ही गोष्ट आली.

"चिंतोपंत, माझे घरीं आज सत्यनारायण आहे. येशील का तूं माझेकडे ? शिवाय मला तुला कांहीं सल्ला विचारावयाचा आहे. मला माहित आहे, हरिश्चंद्राबद्दल तुझे मनांत कांहीं तरी विचारावयाचें आहे. त्याचाहि खुलासा होईल."

"छे: छे: ! माझे मनांत तसें कांहीं नाहीं. तसें असतें तर, सुभेदार, मी तुला सरळ विचारलें असतें. पण कोण हा ? मुलगा का ?"

"छे:, मुलगा नाहीं. हा गनीम आहे गनीम," सुभेदार बोलला.

"गनीम ?" मी आश्चर्यानें उद्गारलों.

"हो गनीम, आपला शत्रु. तूं जेवायला ये म्हणजे सर्व खुलासा होईल."

"बरं किती वाजतां येऊं ?" मीं विचारलें.

हा सुंदर तरुण सुभेदाराचा गनीम. हा काय अद्भुत प्रकार? मी आश्चर्य व गूढता यांनीं भारून गेलों.

"ये, केव्हांहि प्रसादाला. पण परत जाण्याची घाई मागें ठेवूं नकोस. जेवायलाच ये. माझा पत्ता नाहीं घेतलास. हा माझा पत्ता."

सुभेदार लष्करांत राहत होता. मीं त्याचा पत्ता टिपून घेतला. मी त्याचा पत्ता सांगत नाहीं. नाहींतर कोणी जाऊन सुभेदाराला विचारील कीं, ही गोष्ट खरी आहे कां खोटी आहे ?

त्या दिवशीं रात्रीं आठ वाजतां मी सुभेदाराच्या घरीं गेलों. सत्यनारायणाकरितां त्याचे येथें त्याचे जातीचा खूप मोठा समाज जमला होता.

त्याचे घरासमोर मंडळींची खूप गर्दी जमली होती. त्यामुळें त्याचें घर शोधून काढण्यास मला फारशी पंचाईत पडली नाहीं.

सुभेदाराच्या येथें कमालीची स्वच्छता होती. माझे येथें तरी इतकी स्वच्छता असेल किंवा नाहीं याची शंकाच आहे. मी जेवावयास येणार म्हणून गौरूनें कमालीची काळजी घेतली असली पाहिजे अशी माझी खात्री होती. गौरू स्वयंपाक करण्यांत फारच निष्णात होती. सुभेदार भागवतधर्मी माळकरी असल्यामुळें त्याचें जेवण पूर्ण शाकाहारी असे. त्यामुळें त्यांचे येथें जेवण्यास मला कसलीच पंचाईत नव्हती. वास्तविक मी सुभेदाराच्या पंगतीलाच काय, पण त्याच्या पुढ्यांत देखील जेवावयास भिणार नाहीं. त्याचे वॉटर-बॉटलमधील उष्टें पाणी पिऊन मी आपला स्पृश्य आत्माराम या कुर्डीत पेनशन घेण्याकरितां अडकवून ठेवला नाहीं काय ? मग सुभेदाराचे पुढयांत जेवण्यास मला कोणती हरकत आहे ? मला माहीत आहे कीं, सुभेदार अत्यंत निरोगी आहे; कमालीचा स्वच्छ आहे. त्याचे पुढयांत जेवल्यामुळें मला कोणताहि रोग होण्याचा संभव दिसत नाहीं. उलट बिचाऱ्या सुभेदाराला मात्र माझे-पासून भीति होती. कारण अलीकडे मला पायेरिआची व्यथा जडली आहे, असा मला संशय येऊं लागला होता. म्हणून दंतवैद्यास मी माझे दांत दाखविण्याचे विचारांत होतों.

असो. मी आल्याबरोबर सर्व मंडळींनीं मला उत्थापन दिलें व सुभे-दाराच्या मुलानें म्हणजे हरिश्चंद्रानें मला मोठ्या आदरानें हाताला धरून घरांत नेलें. स्वयंपाकघरांत आरशांत तोंड दिसावें त्याप्रमाणें भांड्यांच्या दुडी विजेच्या प्रकाशांत लखलख करीत होत्या. गौरूनें कमालीचा स्वच्छ व पांढरा शुभ्र पोषाख केला होता. गौरू देखील सुभेदाराप्रमाणें काळीसांवळी होती. त्यामुळें हरिश्चंद्राबद्दल माझा संशय दुणावला. ती पांढऱ्या शुभ्र टॉवेलनें ताटें, वाट्या, चमचे स्वच्छ पुसून काढीत होती. दुसरी एक बाई ब्रशानें नळाखालीं पाट धुऊन काढीत होती. माझेकरितां जेवणाची खास व्यवस्था चालली होती.

हरिश्चंद्रानें मला घराचे मागील बाजूस एक स्वच्छ सारवलेलें अंगण होतें तिकडे नेलें. अंगणाचे मध्यभागीं एक लहानसें तुळशीवृंदावन

होतें. तेंहि स्वच्छ सारवून त्यावर गंधाचे पांढरे ठिपके उमटविलेले होते. तुळशीवृंदावनांत फुलें पडलीं होतीं. तुळशीची नित्यनेमानें पूजा होत असावी असें दिसलें. तुळशीच्या बुंध्यांत एक तांब्याचा बाळकृष्ण होता व त्याचे शेजारीं एक लहानशी दगडाची महादेवाची पिंडी होती. उन्हानें पिंडीचा दगड उकलून तिला खांडें गेलीं होतीं. आंगणांत दिवा वगैरे कांहीं सुद्धां नव्हतें. पण चांदणें पिठासारखें पडलें असल्यामुळें मला सर्व कांहीं स्पष्ट दिसत होतें. अंगणाच्या पलीकडच्या कोपऱ्याला एक डाळिंबीचें झाड होतें. त्याचेखालीं माचा टाकून सुभेदार बसला होता. सुभेदार उठून मला सामोरा आला व "या, चिंतोपंत" असें म्हणून त्यानें मला माच्यावर नेऊन बसविलें व आपणहि माझेशेजारीं बसला.

"हरिश्चंद्रा, तूं मंडळींना पानसुपारी वांट व ज्यांना जेवावयास ठेवून घेतलें आहे त्यांना माडीवरच्या पुढल्या दालनांत नेऊन बसव. त्यांचे करमणुकीकरितां फोनो लाव. मात्र आमच्या बाजूच्या खिडक्या लावून घे. आम्हांला कांहीं गोष्टी बोलावयाच्या आहेत."

सुभेदाराच्या आज्ञेप्रमाणें व्यवस्था लावण्याकरतां "जी" म्हणून हरिश्चंद्र निघून गेला.

"मग, चिंतोपंत, म्हाप्रळ मुलांच्या शिक्षणाकरतां सोडलंस ?"

"होय, सुशीलेचें कॉलेजचें शिक्षण सुरू झालें. मला देखील तालुक्याला जाऊन पेनशन घेण्याचा त्रास पडूं लागला. पावसाळ्यांत 'तर' बंद झाली म्हणजे चार महिने आम्हांला काळें पाणी. आणि पेनशन नाहीं तें नाहीं. अशा अडचणी येऊं लागल्या. शिवाय माझा जन्म घांटावर गेलेला. हिंदुस्थानांत नोकरी झाली. पराशिअन गल्फ, मेसापोटेमिया, क्वेट्टा हिंडलों, मला कुठली कोंकणची हवा मानवायला ? आलों झालें पुण्याला. पेनशनरला काय ? कुठेंहि राहावयाचें."

"माझंहि तेंच झालं. हरिश्चंद्र इंटरमध्यें आल्यापासून मी येथेंच येऊन राहिलों. मला त्याला महिन्याचे महिन्याला पैसे पाठवतां येईनात. मग मी देखील बिऱ्हाड येथें केलें. मी कधीं पहिल्या तारखेला पेनशन घेत नाहीं म्हणून तुझी व माझी भेट झाली नाहीं. या खेपेला सत्यनारायणाकरितां

खर्चायला पैसे पाहिजे होते म्हणून मी पहिल्या तारखेला आलों. सुदैवच माझें. तुझी व माझी त्या निमित्तानें भेट झाली. ''

" हो खरंच. नाहींतर एका गांवांत राहून आपला एकमेकांना पत्ता लागला नसता. पण हरिश्चंद्र तुझा गनीम, शत्रु, ही काय भानगड आहे?" मीं विचारलें.

" तेंच सांगण्याकरितां तुला मी बोलावलें आहे. ऐक नीट. एल एमिरची लूटमार झाल्यावर तुर्क, अरब व बखत्यारी निघून गेले. एल एमिरला तुर्कांचा जमाव फार लहान होता. त्यांचा गॅरिसन फार लहान होता. आपल्या सैन्यानें त्यांचा पुरा कोंडमारा केला. त्यांची रसद पुरी बंद झाली. मग त्यांचा कमांडर अशिद्‌बे यानें एक डाव रचला. तो फार शूर व धाडशी होता. त्यानें अरब व बखत्यारी टोळ्यांशीं संगनमत केलें. त्यामुळें त्याचें त्या दिवशींचें साहस फळाला आलें हें तुला माहीत आहेच. आपण तीन महिने त्याचा कोंडमारा केला तो फुकट गेला. त्याला दारूगोळा व अन्न-सामुग्री भरपूर मिळाली. ती लढाईची चकमक म्हणण्यापेक्षां एक दरोडाच होता. त्यांत अरब व बखत्यारी लोक लुटीकरितां सामील झाले होते. त्यांनाहि लुटीचा वांटा भरपूर मिळाला. लढाईमुळें त्यांचीहि उपासमार चालली होती. त्या लुटीनंतर बखत्यारी लोक एल एमिर सोडून गेले! अशिद् ताजातवाना झाला. हा पराजयाचा डाग धुऊन काढण्याकरितां आपल्या कमांडरचा अशिदबेवर जाण्याचा हुकूम सुटला. अशिद्‌बेनें गॅरिसन लढवण्याचे ऐवजीं आपणाला तो लढवतां लढवतां सांभाळणें शक्य नाहीं असें थोडे दिवस त्यानें लढाई करून दाखवलें व एके दिवशीं तो हळूच रिकामा केला. इंग्लिश कमांडर रणोत्सवानें बेभान झाला. त्यानें अशिद्‌बेला जिवंत पकडण्याची तयारी केली. अशिदबेचा पाठलाग सुरू झाला. आमचें सैन्य युफ्रेटीस नदी डाव्या हाताला ठेवून चालूं लागलें. महामोऱ्याचे शेखची व इंग्लिशांची मैत्री जमली होती म्हणून तुम्हांला आधींच डेपो घेऊन मागें जाण्याचा हुकूम झाला होता. तेव्हांपासून तुमची व आमची ताटातूट झाली होती. त्यामुळें या पुढल्या गोष्टी तुला माहीत नसतील.

तुम्ही डेपो घेऊन मागें गेलांत व आम्ही धांवपळ करीत अशिद्‌बेचा पाठलाग करूं लागलों. सगळें बटॅलिअन कामगिरी करीत होतें. दिवसभर

बाळूंतून आमचा मार्च चाले. जिकडे तिकडे मृगजलाचा पूर चालला आहे असें वाटे व त्यांत खजुरांच्या राईचें प्रतिबिंब तरंगतांना दिसे. पण जवळ गेलें कीं कांहीं नाहीं. एखाद दुसरें खजुरीचें झाड आम्हांला तेथें सांपडे. त्याचप्रमाणें पुष्कळ वेळां आम्हांला लांब लांब एखादें शहर दिसे. जणूं काय बाळवंटाची ती राजधानीच. पण जवळ गेलें कीं ती अदृश्य होई. वाळूचे रणांत दृष्टिभ्रमाचे असले चमत्कार खूप दिसतात.

जेव्हां आमचा कमांडर दुर्बिण लावून पाही तेव्हां त्याला क्षितिजावर हालचाल दिसे. स्काउटस् देखील 'शत्रू जवळ आहे' अशा बातम्या आणीत. एके दिवशीं आम्हीं रात्रींचा फोर्स्ड् मार्च करून शत्रूला गांठलें. क्षितिजा-वर त्यांचे दिवे हालचाल करतांना दिसले व रात्रीं शेकोट्या व चुलीचे उजेड दिसले. पण तो कुर्द लोकांचा उंटाचा तांडा निघाला. आतां-पर्यंत आमची समजूत होती कीं ते तुर्कांचे फॉलोअर्स आहेत.

आम्ही सारखे पुढें जात होतों. दोन्ही बाजूंच्या बगलांकडून अरब आमच्यावर हल्ले चढवीत व आमची रसद लुटत. एकटा दुकटा शिपाई मागें राहिला कीं तो नेमका मरे. एखादें स्क्वॉड रेंगाळलें कीं तें गारद होई. हिंस्र पशूंप्रमाणें अरब आम्हाला न दिसतां आमचे पाळतीवर राहत व आम्हांला लुटत. अशिदबे केव्हांच पसार झाला होता. कदाचित् ज्या वेळीं आम्ही इकडे भुकेनें मरत होतों त्या वेळीं तो इस्तंबूलला लोडाला टेकून हुक्का ओढीत आपल्या बेगमबरोबर गप्पा छाटीत बसला असेल.

आतांपर्यंत आमची अशी कल्पना होती कीं, अरब आमच्याप्रमाणें तुर्कांनाहि लुटत असतील. पण तुर्क कफल्लक होते. तुर्कांना लुटून त्यांना काय मिळणार? तेव्हां अरबांनीं आमच्यावरच जास्त लक्ष दिलें होतें. आम्ही खूप पुढें गेल्यावर तुर्कांचें एक मोठें सैन्य आम्हांला आडवें येऊन बसलें. त्या सैन्यानें आमचे मागचे बाजूलाहि वळसा दिला. आमचा पुढला मार्ग खुंटला व आम्हांला मागेंहि सरकतां येईना. जागींच मदतीची बाट पाहत बसावें तर अरबांचा त्रास. शिवाय रसदेची काय व्यवस्था लाव-णार? ४०६ मराठा आम्हाला पन्नास मैलांवर मिळणार होती. तिचा आमचा स्पर्श अद्याप तुर्कांनीं होऊं दिला नव्हता. पुढें मराठा पलटणीनें

निकर केली. त्यांत ४०६ कापून निघाली व आमचे ताबूत थंडे होऊन आम्ही जागींच बसून राहिलों.

हळूहळू आमची युद्धसामुग्री संपूं लागली. लहानशा प्रमाणावर तुर्कांनीं आमचा कुतलअमारा केला. तुर्क गाफिल राहिल्यासारखे दिसत; पण आम्हीं जरा हालचाल केली कीं आम्हांला उत्तर मिळे. आमचे सभोंवार त्यांनीं मोर्चे बांधून ठेविले होते. रसद मिळविण्यास आम्हीं पार्टी पाठविली कीं तडततडडतड करून त्यांच्या बातेच्या झडूं लागत. आम्हाला ठिकाणींच उपाशी मरत मदतीची वाट पाहणें किंवा शेवटची लढाई देऊन मरून जाणें याखेरीज मार्ग उरला नाहीं.

त्या वेळीं विमानांची कला पूर्णतेला गेली नव्हती. विमानें आमचे तळावर घिरट्या घालून आमचेकरितां बिस्किटांचे, दुधाचे डबे व इतर जिनसा खालीं टाकीत. पण तेवढयानें आमचे भागेना. घोडे मारून कापून खाण्याची वेळ आली. हिरवा भाजीपाला मिळेना. त्यामुळें हिरड्या सुजून हिरड्यांचा आजार सुरू झाला. आमच्या कँपमध्यें एक प्रभु गृहस्थ होते. त्यांनीं युक्ति सुचविली. प्रभु लोक बिन्हढीं फार खातात. धान्याला मोड आणून हिरवा भाजीपाला तयार करण्याची त्यांनीं आमचे कमांडरसाहेबाला युक्ति सांगितली. गवताचे व बांबूचे तट्टीवर हरभरे पसरून त्यावर गवत पुन्हां पसरून गवतावर पाण्याचे हबके मारले कीं उबीनें मोड ताबडतोब येत. त्यामुळें आमचा दातांचे रोगाचा आजार हटला. पण उपासमार कांहीं टळेना. रेशन अगदीं थोडें मिळूं लागलें. त्यामुळें शिपाई अशक्त बनूं लागले. इतक्यांत तुर्कांचा जोर कमी पडूं लागला. इंग्रजांचें सैन्य आमचे मदतीला आलें. वेढा उठला. आपली शिकार हातची जाणार म्हणून अरब संतापले व आमचेवर चोरटे हल्ले जास्त प्रमाणांत होऊं लागले.

अशा वेळीं युद्धनीतीचा कायदा असा आहे कीं, आजूबाजूच्या भागांत शत्रूला दहशत बसावी म्हणून सैनिकांना खेड्यांतून घुसून क्रूरता करण्याची, लूट, जाळपोळ करण्याची पूर्ण मुभा देण्यांत यावी. म्हणजे गनीमांवर जरब बसते. त्या कायद्याप्रमाणें आमचे कमांडरनें आजुबाजूंचीं खेडीं लुटून

फस्त करण्याचा हुकूम दिला. जाळपोळ, लूटमार सुरू झाली. आमचे लोक अरबांचेवर चिडून गेले होते. त्यांनीं त्यांचेवर सूड घेण्यास सुरुवात केली.

एके दिवशीं आम्ही सकाळपासून बिजन सुरू केलें होतें. आमचे शिपाई खेड्यांतून शिरून लूटमार करूं लागले. अरब दिसला कीं त्याला गोळी घालून ठार मार, असें चाललें होतें. भयभीत झालेल्या अरब स्त्रिया, पुरुष व मुलें, आपली मालमत्ता टाकून गांव सोडून लांब वाळवंटांत पळून गेले होते. आजूबाजूचीं सर्व खेडीं ओसाड पडलीं होतीं. त्या दिवशीं संध्याकाळीं चार पांच वाजण्याचे सुमारास आम्ही एका खेड्यांतून चाललों होतों. सकाळपासून मी वाळवंटांत भटकत असल्यामुळें मला अतिशय तहान लागली होती. एका खानदानी अरबाच्या घराचा दरवाजा उघडा होता म्हणून त्यांत पाणी मिळेल या आशेनें मी शिरलों व पायऱ्या चढून ओटीवर आलों. तुला ठाऊक आहे कीं त्या वेळीं मी साधा शिपाई होतों. म्हणून संगीन लावलेली रायफल माझे हातांत होती. अशा वेळीं रायफलीचे मॅगझिनमध्यें गोळया भरून संगीन चढविण्याचा हुकूम दिलेला असतो. कारण गनीम केव्हां कुठून हल्ला करतील याचा नेम नसतो. त्यांत अरब अत्यंत शूर व धाडसी होते. त्यामुळें आमच्या जिवाच्या बचावाकरितां आम्हांला अगदीं सावध राहावें लागत होतें.

मी त्या घराच्या ओटीच्या पायऱ्या चढून वर आल्याबरोबर ओटीच्या भिंतीवर टांगलेला चिकाचा पडदा हलल्यासारखें मला वाटलें. अशा वेळीं पहिल्यानें जो हल्ला करतो तोच जिवंत राहतो. त्या वेळीं आपलें संरक्षण हीच शिपायाची ड्यूटी असते व शिपायाला त्याचें शिक्षण दिलेलें असतें. कोणतेंहि काम बिजलीके माफक चटकसे करणें ही एक लष्करी शिस्त असते व ती शिपायाचे रोमरोमांत बाणलेली असते. त्या शिस्तीला अनुसरून कोणताहि विचार मनांत येण्याचे आंत मी जेथें पडदा टांगला होता त्या ठिकाणावर संगिनीचा मारा केला व संगीन डावे बाजूला खेंचली. तसें केलें नाहीं तर संगीन हल्ला केलेल्या शरिराच्या मासांत किंवा हाडांत अडकून बसते व हत्यार पुढील मारगिरींत उपयोगांत आणतां येत नाहीं.

मी संगीन भोसकल्याबरोबर मला पडद्याच्या मागील व्यक्तीची एक मोठी किंचाळी ऐकूं आली. त्या व्यक्तीनें आतांपर्यंत पडद्याचीं टोकें

आवरून धरून ठेवलीं होतीं तीं सोडून दिलीं. चिंतोपंत, मला काय देखावा दिसला असेल ? हरहर! नको नको, ती आठवण! ती आठवण मला अजून सहन होत नाहीं. काय तें भयाण दृश्य ! त्या व्यक्तीनें तो पडदा सोडून दिल्यामुळें तें मूर्तिमंत भेसूर चित्र सबंध माझेपुढें उभें राहिलें.

ती व्यक्ति म्हणजे एक सुंदर यवन स्त्री होती. मला मागून कळलें कीं ती तुर्कजातीची होती. माझे संगिनीनें तिचे ओटीपोटाचा कोथळा कापून निघाला होता. त्या वेदनांनीं तिनें पडद्याचीं टोकें सोडून दिलीं होतीं. ती त्या जखमेनें घायाळ होऊन खालीं कोसळून पडण्याच्या बेतांत आली होती. परंतु ती भिंतीच्या कोनाड्याचे कडांवर आपले सुंदर हात रोवून भिंतीवर रेलून त्या आधारावर कापलेल्या केळीप्रमाणें उभी राहिली होती. माझी संगीन तिचे शरीरांत अडकून बसली होती. तसल्या जखम झालेल्या स्थितींत देखील तिनें आपल्या काळ्याभोर डोळ्यांची माझेकडे टक लाविली होती. ती भीतीनें व वेदनांमुळें दगडासारखी निश्चल रीतीनें माझेकडे पाहत होती. मी बेभान स्थितींत तिजकडे पाहत राहिलों.

इतक्यांत माझी संगीन व रायफल मला जड लागली व मला टयँहा असा एक आवाज ऐकूं आला. त्या जखमेंतून एक सुंदर व गोजिरवाणें मूल जन्मास येत होतें."

" व: व: ! काय चमत्कार ! जगज्जेता सीझर रोमचा बादशाह याच रीतीनें जन्मास आला होता. कांहीं बायकांची नैसर्गिक रीतीनें सुटका होत नाहीं त्या वेळेला डॉक्टर लोकांना अशा तऱ्हेचें ऑपरेशन करावें लागतें. त्या आपरेशनला 'सिझेरन सेक्शन घेणें' असें म्हणतात." मी आश्चर्यानें उतावीळ होऊन बोललों.

" हां, बराबर. कमांडरसाहेबबी असंच कांहीं बोलत होता ." सुभेदार आपली गोष्ट पुढें सांगूं लागला. " तो बोलला कीं, ' बच्चेका नाम कैझर कैसर ऐसा कुछ रखना' ! पण मला त्या वेळीं तो असें कां बोलला तें कळलें नाहीं. तें मूल पुरें जन्मास आलें नव्हतें. तें संगिनीवरून घसरत बाहेर येत होतें व मीं धरलें नसतें तर तें खालीं आदळलें असतें. मीं रायफलचा दस्ता खालीं टाकला, त्या मुलाचे खांदे पकडून त्याला ओढलें, त्याची सुटका केली व त्याला खालीं गालिच्यावर ठेवलें. ती यवनसुंदरी भिंतीला खिळली

होती म्हणून ती खालीं पडली नाहीं. निश्चल स्थितींत ती उभीच्या उभीच राहिली होती. तिचे शरीरावर एका पायाचा दाब देऊन मी संगीन हळूच ओढून काढली. संगीन उपसून निघाल्याबरोबर रक्ताचा लोट बाहेर आला. मग मीं तिला हातांनीं धरून खालीं गालिच्यावर त्या मुलाचे शेजारीं निजविलें. तिचे शरीरांतून रक्ताचा पाट चालला होता.

हें सर्व वर्णन करतांना मला वेळ लागला; पण त्या वेळीं या गोष्टीला किती वेळ लागला हें मला सांगतां येणार नाहीं. मी इतका एकचित्त झालों होतों.—मला भानच नव्हतें. पण संध्याप्रकाश अजून खूपच होता. मी मनांत स्वतःला शिव्या देऊं लागलों——

'अरेरे ! चांडाळा, पाप्या, तूं हें काय केलेंस ? अधमा, एका गर्भवती अबलेवर तूं संगीन चालविलीस ! एका अनाथ माउलीचा तूं खून केलास व तिच्या निरपराधी बचड्याला तूं अनाथ, पोरकें केलेंस. निपुत्रिका, परमेश्वरानें तुला संतान दिलें नाहीं तें यथायोग्यच आहे. स्त्रीचा खून हीच कां तुझी लढाई ? आतां हें स्त्री-हत्येचें पातक तूं कसें फेडणार ? विठ्ठला, पांडुरंगा, भक्तवत्सला, काय तूं माझे हातून घडवून आणलेंस. परमेश्वरा, करुणा कर, मला क्षमा कर ! मला क्षमा कर. मी काय करूं तें सांग. '

माझे डोळ्यांत अश्रूंचा पूर उठला.

डबडबलेल्या डोळ्यांनीं मी त्या दोन प्राणिमात्रांकडे पाहत राहिलों. माझे डोळ्यांतील पाण्यामुळें मला त्यांचीं शरिरें स्पष्ट दिसत नव्हतीं. ती स्त्री बेशुद्ध झाली नव्हती. तिकडच्या प्रांतांतील तुर्क ज्यू व अरब स्त्रिया फार दांडग्या व सशक्त असतात. ती यवन स्त्री मुलाचे बाजूला एका कुशीवर होण्याचा प्रयत्न करूं लागली. मी तिचा उद्देश समजलों. मीं तिला एका कुशीवर केलें व मूल उचलून तिचेजवळ पाजण्यास दिलें. पण ती रक्तस्रावानें अगदीं अशक्त झाली होती. तिला मुलास स्तन देतां येईना. मीं तिची अडचण जाणली. मग मीं पुनः एकदां परमेश्वराचा धांवा केला व तिचा कबजा वर करून तिचा स्तन मुलाचे तोंडांत दिला. तिचे अंगाखालचा एक हात मीं सोडवून घेतला. दुसरा हात वरचे बाजूला होता तो व खालचा सोडवून घेतलेला हात असे मुलाचे शरिरावर आणून ठेवले व तिला मुलाला धरण्यास सांगितलें. पण तिच्यांत मुलाला धरण्याचें त्राण

राहिलें नव्हतें. मग तिचे हाताचे पंजे मीं मुलावर तसेच दाबून ठेवले व मुलाला तिचे कुशीला पिता केलें.

ती कुशीवर असल्यामुळें तिला मुलाचें तोंड दिसत होतें. त्याचे तोंडाकडे तिनें टक लावली होती. इतक्यांत वरचे हातानें ती हालचाल करूं लागली. मला पहिल्या प्रथम तिचे मनांत काय आहे तें कांहींच कळेना. ती तोंडानें आपल्या भाषेंत एक दोन शब्द पुटपुटली. पण मला ती भाषा कशी कळणार? माझे लक्षांत आलें कीं, तिला आपले मुलावरून मरतांना शेवटचा हात फिरविण्याची इच्छा झाली आहे. मग मीं तिचा भरीव पण गोंडस आणि शुभ्र हात आपल्या हातांत घेतला व हळूहळू त्या तिच्या बाळाचे अंगावरून फिरवूं लागलों. कटिभागावर वरचे बाजूला तिचा हात आल्यावर बळ करून तिनें तो बाळाच्या जांघेंत घातला व तेथें चापसून पाहिलें. मग ती हंसली. तिनें आकाशाकडे डोळे केले व कांहीं तरी पुटपुटून तिनें अल्लाचे आभार मानले. तिचे डोळ्यांत अश्रूंचा पूर उभा राहिला. त्याचे ओघळ वाहतांना मला स्पष्ट दिसत होते. तें निर्व्याज अर्भक जणूं कांहीं झालें नाहीं असें समजून तिचा स्तन चुरू चुरू ओढीत होतें. एका बाजूनें तिचे जीवनरसगंगेला ओहट लागला होता तर दुसरे बाजूनें तिचे स्तनांत बाळाचें जीवनाचें दुग्ध रसगंगेला भरती आली होती. माझे डोळ्यांत अश्रूं मावेनात. काय ही लढाई! काय हे तिचे परिणाम!

माझेकडे पाहून ती कांहींतरी पुटपुटली. मीं तिला 'हें मूल मी मारणार नाहीं; कोठें तरी सुखरूप घेऊन जाईन; त्याला दूध पाजीन; त्याचा सांभाळ करीन' असें खुणेनें सांगितलें. माझ्या आतांपर्यंतच्या कृतीवरून तिला बराच धीर आला होता. मीं खुणांनीं तिचे मुलास अन्तर देणार नाहीं असें सांगितल्यावर तिला खूप समाधान झालें असें तिच्या तोंडावरून दिसलें.

नंतर तिनें खूप बळ केलें व आपलें तोंड वांकवून त्या मुलाचीं मटामट तीन-चार चुंबनें घेतलीं. तिचे तोंडावर टवटवी आली होती. पण ती अंतःकाळची टवटवी होती. दिव्यांतील तेल संपल्यामुळें विझतांना तो जसा मोठा होतो त्यांतलीच तिची गत होती. बळ करून तिनें आपल्या छबकड्यास हृदयाशीं आवळून धरलें व त्याचें पुनः एकवार चुंबन घेतलें. मग ती कुशीवर होती ती आपोआप उताणी झाली. तें मूल तिचे कुशीला होतें तेंहि हुशीसरसें

तिचे वक्षःस्थलावर गेलें. त्या स्त्रीनें आपले डोळे मिटले. त्या मुलानें तिचा स्तन अद्याप सोडला नव्हता. त्याला काय माहीत आपली आई मेली आहे? तें आपलें तिचा स्तन सारखा चुरू चुरू ओढीतच होतें."

सुभेदाराचा कंठ भरून आला. तो थोडा वेळ थांबला. डाळिंबीचीं फुलें झाडावर उलट्या घंटांसारखीं उमललीं होतीं. त्यांतून दोन मकरंदाचे बिंदू माझे हातावर पडले. सुभेदार थांबला होता, तो पुनः बोलूं लागला,

" मीं त्या स्त्रीचे नाकास हात लावला, तिचा श्वास बंद पडला होता. तिची नाडी लागत नव्हती व तिचें कलेवर काल्यासारखें गार लागत होतें. तिचा आत्मा मातृहृदय सोडून तिचे अल्लाकडे निघून गेला होता. संध्येच्या शेवटच्या किरणांनीं क्षितिजावरून पाताळांत उडी मारली. अंधाराचें साम्राज्य सुरू झालें.

आतां मी काय करूं ? माझा पेशा लष्करी, तशांत मी मोहीमेवर. गांवांत कोणी चिटपांखरूं नाहीं. आमचे शिपाई लूटमार करीत होते ते अंधार पडल्यावर छावणीकडे निघून गेले होते. गांव भीतीनें ओस पडला होता. सर्वजण गांवकरी गांव सोडून वाळवंटांत पळून गेले होते. ही स्त्री गर्भार असल्यामुळें मार्गे लपून राहिली असावी. तिचा अशा रीतीनें अंत झाला. आतां या मुलाचें संगोपन कोण करणार ? मी तर तिला वचन देऊन चुकलों होतों. आणि वचन दिलें नसतें तरी देखील या नुकत्याच उपजलेल्या मुलाला मी अशा स्थितींत सोडून कसा जाणार ? मीं काडी उजळली, महत्प्रयासानें दिवा शोधून काढला व लावला. नंतर मी घराबाहेर आलों व दरवाजा लावून घेतला. अरबांचीं घरें फार बंदिस्त असतात. बाहेरचें कवाड लावून घेतलें कीं आंत कोणालाहि शिरतां येणें शक्य नसतें. मला त्या मुलास व त्याचे आईचे प्रेतास सोडून बाहेर जाणें शक्य नव्हतें. कारण त्या ओसाड गांवांतून लांडगे, तरस व कोल्हीं यांच्या बुभुक्षित टोळ्या हिंडत होत्या.

मीं सर्व गांव धुंडाळून पाहिला. पण कुठेंहि चिराग नाहीं. अखेर गांवाचे दुसऱ्या टोंकाला मला दाराच्या फटींतून उजेडाची तिरीप दिसली. मीं दार ठोठावलें पण आंतून उत्तर नाहीं. मीं दाराच्या फटींतून पाहिलें

तों एक ज्यू म्हातारी भिंतीला टेकून उभी होती. मीं दारावर लाथा मारल्या त्याबरोबर तिनें दिवा मालवून टाकला. माझा संताप अनावर झाला. ओरडून तिला समजावून सांगणें शक्य नव्हतें. कारण माझी भाषा तिला कशी कळणार? मीं जोर करून दारास पाठ लावली. त्याबरोबर दार मोडलें. मी घरांत शिरलों व अंधारांत चापसून त्या म्हातारीला पकडलें. मग तिचे दंडास धरून तिला बाहेर काढलें.

आकाशांत नुकताच चंद्रोदय झाला होता. त्या शून्य गांवांत चंद्राचे प्रकाशांत काळ्या सावल्या भेसूर दिसत होत्या. मी त्या ज्यू स्त्रीला खुणांचे भाषेनें, 'एक स्त्री मेली असून तिचें एक मूल अनाथासारखें पडलें आहे, तेव्हां तूं मदतीला चल' असें समजावून सांगितलें. तिला साधारण आशय कळला व ती येण्यास तयार झाली. आणि ती आली नसती तर मी तिला जबरदस्तीनें घेऊन जाणार ही भीति तिला होतीच. कारण माझे हातांत संगीन चढवलेली रायफल होती. त्या म्हातारीला कोणी खाणार नाहीं अशी तिची पक्की खात्री होती. कांहींहि असो, ती मजबरोबर येण्यास तयार झाली. ती पुढें चालत होती व मागून तिला मी खुणांनीं रस्ता दाखवीत होतों. मला तशा तऱ्हेची काळजी घेणें भाग होतें. कदाचित् ती ज्यू म्हातारी पळून गेली असती.

अखेर आम्ही दोघेंजण, तें अर्भक व मृत स्त्री पडली होती त्या ठिकाणीं आलों. तें मूल मृत मातेचें स्तन तोंडांत धरून माझ्या क्रूरतेकडे लक्ष न देतां परमेश्वरी समाधानानें झोंपलें होतें. तो देखावा पाहून ज्यू म्हातारीचें देखील हृदय कळवळलें. तिनें दोन्ही हात जोडून जेहोव्हाचा धांवा केला.

मी व त्या ज्यू स्त्रीनें खणण्याचीं हत्यारें शोधून काढलीं, त्या घराचे चौकांत खड्डा खणला व त्या मृत स्त्रीला मूठमाती दिली. नंतर आम्हीं दोघांनीं पुरलेलें शव कोणी श्वापद उकरणार नाहीं अशी व्यवस्था केली. मग त्या म्हातारीला मी 'मुलाला घेऊन जा व त्याचा सांभाळ कर' असें सांगितलें. मजजवळ थोडे पैसे होते तेहि मी तिला दिले व सांगितलें कीं, 'उद्यां सकाळीं मी मूल पाहण्यास येईन.' म्हातारी फार दरिद्री होती. म्हणूनच ती अशा परिस्थितींत गांवांत राहिली होती.

बेंजामिन नांवाचा आमचा रेजिमेंट क्लार्क ज्यू होता. त्याला हिब्रू समजत होतें. त्याला घेऊन मी दुसरे दिवशीं सकाळीं म्हातारीकडे गेलों. आम्ही आल्यावर म्हातारीनें चिंध्यांत गुंडाळलेलें मूल आंतून बाहेर आणलें व पुढल्या दारांत उभें राहून तिनें उजेडांत धरलें व आम्हास दाखवलें. मूल गोरें भरभरीत असून त्याचेवर गुलाबी छटा होती. नुकत्याच उगवणाऱ्या सूर्याचीं सोनेरी किरणें त्याचेवर पडलीं होतीं; त्यामुळें त्याचे डोळे दिपत होते. माझेकडे पाहून तें खुदकन हंसलें. मीं मनांत म्हटलें,

'कुठली रे तुझी आणि माझी ओळख ? मी दापोलीचा आणि तूं मेसापोटेमियांत जन्मास आलेला. तुझी माझी पूर्वजन्माची ओळख असली तरी तूं इकडे रे कोठें जन्म घ्यावयास आलास ?'

बेंजामिननें दुभाष्याचें काम केलें. म्हतारी जें कांहीं हिब्रूंत बोले त्याचा आशय तो मला हिंदींत सांगे. म्हातारी म्हणाली, 'ती मृत स्त्री तुर्क जातीची होती. ती एका तुर्क ऑफिसरची विधवा स्त्री होती. ब्रिटिशांच्या पहिल्याच चकमकींत तुर्क ऑफिसर मारला गेला. तुर्क गॅरिसन येथें होता तोंपर्यंत तिला संरक्षण होतें व त्या आधारावर ती येथें राहिली. पण तुर्क गॅरिसनला एकदम कूच करावें लागलें. त्यामुळें ती मागें राहिली. त्यांना तिला बरोबर नेण्यास सवड मिळाली नाहीं. अशा रीतीनें तिचा आधार गेल्यावर ती त्या घरांत छपून राहूं लागली. कारण तुर्कांचें व अरबांचें वाकडें असतें. तिला कोणत्या वेळीं दगा झाला असता याचा नेम नव्हता. तिचे दिवस भरले असल्यामुळें तिला पळून जाणें अशक्य होतें. तुमचे शिपाई जेव्हां गांवांत शिरले तेव्हां तिचे हबशी नोकर पळून गेले. ती कुठली राहणारी हें मला माहीत नाहीं. त्या नवराबायकोशिवाय त्यांचे कोणी नातेवाईक इकडे नव्हते.'

बेंजामिननें तिला मूल सांभाळण्याबद्दल विचारलें तेव्हां ती म्हणाली, 'गांवांत कोणी चिटपाखरूं राहिलें नाहीं. त्यामुळें मला येथें राहण्यास धीर निघत नाहीं. अलेप्पोला(Aleppo)माझा जांवई रेशमाच्या वखारींत कामावर आहे तिकडे मी निघून जाणार. रस्ता वाळवंटांतून आहे त्यामुळें मुलाला घेऊन तिकडे जाणें धोक्याचें आहे व शक्यहि नाहीं. असल्या धोक्याच्या

प्रवासांत तान्ह्या मुलाची जबाबदारी कोण घेणार ? आणि शिवाय माझे जांवयाला आवडले नाहींतर ? त्याची घरची गरिबी. त्याला एक बायको, पांच मुलें व एक बहीण कुटुंबाला. त्यांत मी म्हातारी पाव्हणी जाणार.'

मी सांगितलें कीं, मी नियमानें पैसे पाठवीन. तरी देखील ती कबूल होईना. आतां काय करावें ? रेजिमेंटला एखादा आवडीचा प्राणी पेट म्हणून पाळण्याचा हुकूम असतो. पण या मुलाला रेजिमेंटमध्यें कोण येऊं देणार ? कमांडिंग ऑफिसर या गोष्टीला कबुली देणार नाहीं. त्यांत हा मुलगा पडला गनीम. मी सचिंत होऊन खालीं पाहत विचार करूं लागलों. मला कांहींच तोड सुचेना.

बेंजामिन कांहीं तोड सुचवतो कां म्हणून मी त्याचेकडे पाहिलें.

'गावडे, चल उचल तें मूल. आपण कमांडिंग ऑफिसरला सांगू.' बेंजामिन उद्गारला !

आम्ही तें मूल आळीपाळीनें घेत छावणीवर आणलें व आम्ही दोघे ओ. सी. चे समोर जाऊन उभे राहिलों. माझे हातावर तान्हें मूल पाहून ओ. सी. मला म्हणाला,

'गावडे, ये क्या लाया ?'

'साब्, ये बच्चा है' मी म्हणालों.

'इदर गनीम मारनेका है। अब् तो गनीम पैदा कर रहें.' ओ. सी. नें एक डोळा मिचकावून मिस्किलपणानें हंसून म्हटलें.

'साब, ये मेरा बच्चा नहीं.'

'फिर किसीका ? और इदर किस लिऐ लाया ?'

मग मीं साहेबाला त्या बच्चाचा इतिहास सांगितला. साहेब गंभीरपणानें सर्व कांहीं ऐकत होता. माझे बोलणें संपल्यावर ओ. सी. म्हणाला, 'ही लढाई आहे. हिच्यांत दयामाया कांहीं उपयोगी नाहीं. गनिमांना गनीमाप्रमाणें बागवलें पाहिजे. नाहींतर सैन्याचे बरोबर एक फिरतें अनाथालय ठेवावें लागेल. अशा तऱ्हेनें दया दाखवली तर सैन्याची शिस्त बिघडेल व गनीमावर जी जरब बसली आहे ती नाहींशी होईल.'

साहेबाचें हें बोलणें ऐकल्यावर मला जरा रागच आला. मी म्हणालों, 'मी या मुलाचे आईचे नाशाला कारण झालों आहें. या एक

दिवसाच्या मुलानें जगावें कसें ? माझा धर्म मला याचें पालन करण्याला सांगत आहे.'

'पण मला सैन्याची शिस्त मोडतां येणार नाहीं. तूं हें कोणा तरी अरबाच्या स्वाधीन कर.'

माझे छातीवर लटकत असलेल्या व्हिक्टोरिया क्रॉसला मीं हात घातला व त्याची रिबन सोडवूं लागलों. तुला माहीतच आहे मला बहादुरीबद्दल क्रॉस मिळाला होता. साहेबानें माझे मनांतील हेतु ओळखला.

'अच्छा लेकिन आब् उसकू...उसकू...' साहेबाला मूल पाजण्याला हिंदी शब्द आठवेना. तो आपले मायांना हात लावून खुणेनें, तूं हें मूल पाजणारा कां म्हणून मला विचारूं लागला. साहेब माझी चेष्टा करीत होता.

'साहेब, ग्लॅक्सोचे डबे स्टोअरमध्यें चुकून आले आहेत. त्यांचें दूध करून पाजतां येईल.' बेंजामिन माझे मदतीला धांवून आला.

'आच्छा, बंस्दोबस्त ठीक रखना. कुच् चीज् जरूर होगी तो बसरेके इस्पितालसे मंगाना। ओ भेज देंगा।'

साहेबानें आम्हांस परवानगी दिली म्हणून आम्ही आनंदानें रेजिमेंटचे सर्व लोक त्या मुलाची निगा राखूं लागलों. अशा तऱ्हेनें एक वर्ष गेलें व लढाई थांबली. आम्हीं बसऱ्याला कूच केलें. आम्हीं बसऱ्याला पोंचतों न पोंचतों तों विलायतेंत इंग्लंड व जर्मनीचा तह झाल्याची बातमी आली. मला पुण्याला ३०२ मराठा पलटण होती तिला मिळण्याचा हुकूम झाला. एक दोन दिवसांत ट्रॅन्सपोर्टचें एक जहाज मुंबईस जाण्याकरतां बसऱ्याहून सुटणार होतें. त्या जहाजानें जाण्याची मी अधिकाऱ्यांकडून परवानगी मिळवली व त्यांत बसून मी मुंबईस आलों.

मी ज्या वेळीं बसऱ्यास आलों तेव्हां एक वेळ मला असें वाटलें कीं, चांगला घरंदाज मुसलमान गांठून त्याला हें मूल देऊन टाकावें; या मुसलमान मुलाची ब्याद आपले मागें कशास लावून घ्यावी ? पण हा विचार मनांत आला कीं, यूफ्रेटिस नदीवरच्या त्या खेडेगांवांतील भयाण देखावा माझे डोळ्यांसमोर उभा राही. या बाळाची आणि त्याच्या आईची ताटातूट म्यां केली होती. ज्या हातांनीं या बाळाच्या आईला यमसद-

नाला पाठवलें होतें त्या हातांचा पाळणा करून मी याला लहानाचा मोठा करीन अशी प्रतिज्ञा मीं केली होती ती मी विसरणें शक्य नव्हतें. या बाळराजाला जात कसली ? ईश्वर सर्व भूतमात्रांचे ठिकाणीं आहे असं माझा धर्म मला सांगत नाहीं काय ? एकनाथमहाराजांची काय शिकवणूक आहे ? भूतदयेमुळें माझा हिंदुधर्म सर्व धर्मांत श्रेष्ठ ठरला आहे. कांहींहि होवो मी या मुलाला मानसपुत्र करण्याचें ठरवलें.

याप्रमाणें त्या मुलाकडे पाहतांना माझे मनांत विचार येत. असे विचार माझे मनांत आले कीं तें मूल माझेकडे टक लावी व मध्येंच खुदकन हंसे. त्याचे हंसण्यामुळें माझा निश्चय दुप्पट जोरानें दृढ होई. या मुलाची जबाबदारी दुसऱ्यावर टाकली असती व त्यानें ती पार पाडली नसती तर मी देवाघरीं गुन्हेगार ठरलों असतों. अखेर मी त्याला आपले जवळ कायमचा ठेवून घेण्याचा व त्याचें संगोपन करण्याचा निश्चय केला.

मी मुंबईला येत आहें अशाबद्दलची तार मी गौरूबाईला ट्रॅन्सपोर्ट-शिप बसऱ्याहून सुटण्याचे आधीं थोडा वेळ केली होती. त्याप्रमाणें ती मुंबईस आली व जहाज धक्क्याला लागण्याची वेळ जाहीर झाली होती त्याचे आधीं मला धक्क्यावर उतरवून घेण्याकरितां हजर झाली. किती तरी वर्षांनीं तिचें मला दर्शन झालें ! लढाईतून मी सुखरूप हिंदुस्थानला परत आलों हें पाहून तिच्या डोळ्यांत आनंदाचे अश्रू उभे राहिले. पण माझेबरोबर तान्हें मूल आहे हें पाहून तिला एकदम आश्चर्य वाटलें. बंदरावरून बोरीबंदरचे स्टेशनवर जातांना मी तिला सर्व हकीकत सांगितली व हें मूल आपलेंच आहे असें दोघांनीं मानावयाचें ठरवलें. आगगाडींत आम्हीं मुलाचें नांव हरिश्चंद्र ठेवलें.

पुण्यास माझें ओळखीचें कोणी नव्हतें. माझी ४०६ मराठा पलटण लढाईत कामास आली हें मीं मागें सांगितलेंच आहे. सबंध पलटणींतून मी एकटाच काय तो परत आलों. माझेबरोबर मराठेतर इतर पलटणी होत्या. त्यांना ह्या मुलाचा इतिहास माहीत होता. पण त्यांच्याकडून ह्या मुलाची गुप्त गोष्ट फुटणें शक्य नव्हतें. शिवाय त्या पलटणी लांबलांबच्या मिलिटरी स्टेशनांना रवाना झाल्या होत्या.

मी पुण्यास आल्यावर चार महिन्यांनीं आमची पलटण महूला गेली व तेथून ती पुष्कळ ठिकाणीं बदली होत गेली. त्यानंतर आम्हांला आसामांत जाण्याचा हुकूम सुटला. हिंदुस्थानचे कमांडर-इन्-चीफ्साहेबांनीं आसाम व चीनचे हद्दीवर म्हणजे नॉर्थ-ईस्ट फ्रॉंटिअरवर एक नवीन डिव्हिजन उघडला. मला सातआठ वर्षें तिकडेच राहावें लागलें. हरिश्चंद्राचें शिक्षण तिकडेच बंगाली शाळेंत झालें व तो कलकत्ता युनिव्हर्सिटीचा मॅट्रिक झाला. पुढें मी पेन्शन घेतलें. हरिश्चंद्राला मी पुण्यास कॉलेजमध्यें घातलें. त्याची एक टर्म होईपर्यंत आम्ही दापोलीसच राहिलों. "

" हरिश्चंद्राला आपण कोण आहोंत हें माहीत आहे?" मीं प्रश्न केला.

" छेः, मला तो आपला बाप समजतो व माझेवर मुलाप्रमाणें प्रेम करतो. मला तो अतिशय मान देतो. तो अत्यंत विनयशील व आज्ञाधारक आहे."

" मग त्याला हिंदूचा मुलगा म्हणून तूं समजणार व हिंदूंत घुसडून देणार ? "

" तेंच विचारण्याकरितां व तुझी सल्ला घेण्याकरितां तुला मीं बोलावलें. मी त्याला हिंदु वातावरणांत वाढवलें, त्याला भागवतधर्माची शिकवणूक दिली, त्याचे रोमरोमांत हिंदुधर्माविषयीं आदर उत्पन्न केला. आतां तो पक्का हिंदु झाला. पण मी अद्याप त्याचे कान टोंचले नाहींत. तो अविंध राहिला आहे. अजून कोणाच्याहि लक्षांत ही गोष्ट आली नाहीं. तो हिंदुसभेचा व राष्ट्रसेवासंघाचा सभासद झाला आहे. राष्ट्रसेवासंघांत तो कॅप्टनचे हुद्द्यापर्यन्त चढला आहे.

सर्व संघाच्या जमावांत तो उठावदार दिसतो. त्याचे तोडीला दुसरा मुलगा दिसत नाहीं. त्याचा रुबाब, जवानी, भरदार शरीर, रुंद छाती, सुंदर वर्ण व सभ्य वागणूक यांमुळें तो सर्वांना प्रिय झाला आहे. त्यांतल्या त्यांत त्याचा हिंदुधर्माबद्दलचा अभिमान व हिंदुधर्माकरितां वाटेल तें करण्याचा त्याचा आवेश पाहून सर्व लोक तो महार आहे हें सुद्धां विसरतात. ब्राह्मण मंडळी देखील त्याला आपल्याजवळ घेतात, व त्याची शिवत मानीत नाहींत. सोन्या मारुतीच्या दंग्यांत त्यानें सगळ्यापेक्षां जास्त मर्दुमकी गाजवली. त्याची हिम्मत जशी दांडगी आहे तशी त्याची हुशारी देखील अवर्णनीय आहे. दंग्यांत सर्वांत जास्त दंगा करूनहि

तो आपल्या हुशारीमुळें पोलिसांना सांपडला नाहीं व अद्याप त्याचेवर खटला झाला नाहीं. तूं वर्तमानपत्रांत वाचलें असशीलच कीं, एका हिंदु कॉलेज-कुमारीवर मुसलमान गुंडांनीं हल्ला केला तेव्हां एका हिंदु तरुणानें असामान्य शौर्य दाखवून तिची सुटका केली.... ''

'' हो, मीं म्हाप्रळला असतांना वाचलें खरें; पण त्यांचीं नांवें आलीं नव्हतीं वर्तमानपत्रांत. तेव्हां मला ती एडिटरी बातमी आहे असें वाटलें.'' मी म्हणालों.

'' तो हिंदु तरुण म्हणजे हरिश्चंद्र. कॉलेज कुमारीचें नांव मला अद्याप कळलें नाहीं. हरिश्चंद्राला तिचें नांव विचारलें म्हणजे तो लाजतो व सांगण्याचें टाळतो व नांवें प्रसिद्ध केलीं नाहींत त्याला पुष्कळ कारणें आहेत अशा सबबी सांगून वेळ मारून नेतो. त्यामुळें माझे मनांत जरा संशय उत्पन्न झाला आहे. मुसलमान गुंड डोक ठेवून कदाचित् त्यांना पुन्हां मारतील अशी हिंदुपुढाऱ्यांना भीति वाटली. शिवाय मुलीचे अब्रूचा प्रश्न होता. म्हणून असल्या गोष्टी वर्तमानपत्रांत जाहीर न झालेल्या बऱ्या असें त्यांना वाटून वर्तमानपत्रांत त्या मुलीचें नांव आलें नाहीं. तुझी सुशिला कोणत्या कॉलेजांत आहे ?''

'' फर्ग्युसन कॉलेजमध्यें. ''

'' ती मुलगीहि त्याच कॉलेजांत आहे. हिंदूंचा पुढारी स्वामी सहला-नंद हरिश्चंद्राचे शौर्याचें वर्णन रंगांत येऊन करतो तेव्हां तूं ये बघायला. त्यानें त्याचें नांव भीमसेन ठेवलें आहे. कॉलेजांतील मुली पण त्याला चाहतात. तो आतां उमेदवार झाला आहे. मला भीति पडली आहे कीं तो त्यांतील कुणा उच्च हिंदूच्या मुलीशीं लग्न लावतो कीं काय. ''

'' त्यानें लग्न लावलें तर तुझें काय बिघडणार आहे ? हल्लीं हिंदू तेवढे एक अशी चळवळ निघाली आहे. त्याप्रमाणें हा विवाह कांहीं गैर नाहीं. तुझ्या लेकाबद्दल माझे मनांत इतकें प्रेम उत्पन्न झालें आहे कीं कांहीं विचारूं नकोस. हरिश्चंद्राला तूं त्याचा इतिहास सांगू नकोस. तो मनानें, धर्मानें व कर्मानें हिंदु आहे. त्याला तसाच हिंदु राहूं दे. असले मोहरे हिंदुधर्मात येऊं दिले तर हिंदुधर्माचा उदय लवकरच होईल. ते मुसल-मान पहा. त्यांनीं आमच्यांतल्या चांगल्या मुली पळवल्या, चांगले पुरुष

बाटवले व आपली जात सुधरवली. आमच्यांतले क्षात्रधर्मी लोक धर्मान्तरानें कडवे मुसलमान झाले व त्यांनीं त्या धर्माला मजबुती आणली. तेव्हां आपण जशास तसें वागलें पाहिजे." मी सुभेदाराला सल्ला दिली.

"त्याला हिंदु राहूं दे म्हणजे काय? मी त्याला महार करूं? जन्मानें मी महार आहें तेवढें पुरें आहे. परमेश्वराची इच्छा—साता जन्मांचें पातक म्हणून मी महार जातींत जन्माला आलों. महार होणें ही काय तूं सुखाची व अभिमानाची गोष्ट समजतोस? तूं असें समजूं नकोस कीं मी महार जातींत जन्मलों म्हणून मला वाईट वाटत आहे व मी त्या जातीचा द्वेष करीत आहें. उलट हीनदीन अशा सात कोटीच्या जातींत मी जन्मलों म्हणून मला एक प्रकारचा अभिमान वाटत आहे. या लौकिक हीन जन्मामुळें माझा अहंकार नाहींसा झाला आहे. परमेश्वरासमोर मी लीन झालों आहें. एक दिवस असा येईल कीं, माझे महार जातीचा उद्धार होऊन ती श्रेष्ठ पदाला पोंचेल व आम्हांला आमची जात सांगतांना ब्राह्मणां इतकाच अभिमान वाटूं लागेल. पण आजची स्थिति काय आहे? ती जन्मामुळें आम्हांला सहन केलीच पाहिजे. पण मी ती स्थिति हरिश्चंद्रावर कां लादावी? प्रेमामुळें मीं या गुपिताचा अद्याप त्याचेजवळ स्फोट केला नाहीं. पण हरिश्चंद्रानें महार व्हावें ही कल्पना मला पसंत नाहीं. त्या पाक मुसलमानाला मी या हीन कोटींत आणून बसवूं? मीं त्याचे आईला मारून एक पाप केलें, आतां दुसरें करूं काय? मला त्याला सत्य हें सांगितलेंच पाहिजे."

"खरेंच. तूं म्हणतोस तें बरोबर आहे. आपण हरिश्चंद्राला सर्व कांहीं सांगून टाकूं. एवढें सगळें सांगूनहि तो जर महार म्हणून राहिला तर तुझी कांहीं हरकत नाहीं ना?"

"मला हरिश्चंद्राला फसविणें शक्य नाहीं, तसें माझ्या जातीलाहि फसविणें शक्य नाहीं. मला त्यांनाहि सत्यच सांगितलें पाहिजे व आतांपर्यंत त्यांना फसविल्याबद्दल त्यांची क्षमा याचिली पाहिजे. हरिश्चंद्र मुसलमान आहे हें कळल्यावर कोणता महार आपली मुलगी त्याला देईल? अद्यापपर्यंत प्रेमानें आंधळा होऊन मीं ही गोष्ट छपवली ही माझी चूक झाली."

" मोठा बिकट प्रश्न आहे. तूं हा प्रश्न शंकराचार्यांचे समोर ठेव. शंकराचार्यांची स्वारी इथेंच आहे. काल काकीड्यांच्या अरुंद व वांकड्या-तिकड्या बोळांतून त्यांची आडवी पालखी जातांना अडकूं लागली म्हणून तिला उभी करून न्यावी लागली. बोळांत दिवसा देखील मशालींचा चांगला उपयोग झाला. त्या वेळीं खूप गर्दी जमली होती. मीहि तेथें उभा होतों म्हणून मला माहीत. " मी म्हणालों.

" बरं तूं म्हणतोस तसं आपण करूं. पण तूं आयता येथें आलाच आहेस. मी प्रथम तुझी आणि हरिश्चंद्राची ओळख करून देतों. आपण माडीवर जाऊं. "

आजचा दिवस म्हणजे एकामागून एक अनपेक्षित व आश्चर्यकारक गोष्टी घडण्याचा होता. सुभेदार मला अवचित भेटला, हें एक आश्चर्य. हरि-श्चंद्राचें जन्माचें रोमांचकारी रहस्य ऐकून स्टिव्हेन्सनची कादंबरी वाचावी त्याप्रमाणें मी स्तंभित झालों हें दुसरें. मला हें हरिश्चंद्राचें आख्यान ' अरबी रात्रीं ' पेक्षां सुरस व चमत्कारिक वाटलें. मी घरीं परत जाई-पर्यंत मला आणखी काय काय आश्चर्यें पाहावयास मिळणार, अशी मला सारखी भीति वाटत होती. मी संमूढ झालेल्या मनानें सुभेदाराचे मागून जाण्यास उठलों.

माडीवर एक प्रशस्त हॉल होता व जमिनीवर गालिचे पसरले होते. भिंतीचे कडेनें खिडक्या सोडून कोचांच्या व खुर्च्यांच्या रांगा होत्या. त्यांवर सुभेदाराच्या समाजांतील व लष्करांतील आमंत्रित गृहस्थ बसले होते. सर्व पुरुषच होते. पण एका खिडकींत दोन हिंदुस्थानी पेहरा-वाच्या मुली व त्यांचेमध्यें एक दक्षिणी मुलगी पाठमोऱ्या रस्त्याकडे तोंड करून रस्त्याची गम्मत पाहत गप्पा छाटीत उभ्या होत्या. तिन्ही मुली जरी पाठमोऱ्या होत्या तरी त्या सौंदर्यरेखांकित दिसत होत्या. हिंदुस्थानी पेहरावाच्या मुली फिकट पिवळ्या रंगाचीं पिलावें नेसल्या होत्या व या दोन पर्शियन गुलाबाच्या कळ्यांमधें गांवठी गुलाबाच्या घाटदार गेंदा-सारखी त्याच रंगाचें पातळ नेसून ती ठसकेदार दक्षिणी मुलगी उभी होती. मागून अगदीं माझे सुशीलेसारखीच दिसत होती. मी तिजकडे पाहत राहिलों. हरिश्चंद्र मंडळींना पानसुपारी देत होता. त्याला आणण्याकरितां

सुभेदार त्याचेकडे निघून गेला. इतक्यांत दक्षिणी मुलीनें तोंड वळवून माझेकडे पाहिलें. मी आश्चर्यानें सर्दच झालों !

" बाबा ! " ती मुलगी म्हणजे माझी सुशीला म्हणाली.

" कोण, तुझे पपा ? चल आमची ओळख करून दे. " असें म्हणत त्या दोन मुली सुशीलेचा हात धरून तिला घेऊन माझेकडे आल्या.

" हे माझे पपा, ही पिरोज अर्देसिर आणि ही कुलसुम बेगम. ह्या दोघीजणी वाडिया कॉलेजमधें हरिश्चंद्र गावड्यांचे वर्गात आहेत. हरिश्चंद्रांमुळें ह्यांची माझी ओळख झाली आहे. ह्यांनीं आयत्या वेळीं मोटार पाठविली म्हणून मी इथं आलें. त्या वेळीं तुम्हीं आधींच इकडे निघून आलां होतां. मला माहीत नव्हतें तुम्ही इकडे येणार होतां तें. "

" कशी ओळख करून देतेस, सुशीला ? ह्या लेडीजच्या नांवांपुढें मिस् किंवा मिसेस् लावलं असतंस तर मला प्रश्न न विचारतां पुष्कळ गोष्टी कळल्या असत्या. " मीं विनोद करण्याकरितां ओढून चंद्रबळ आणलें.

" मी सांगतें तमाला," पिरोज म्हणाली. " तुम्हीं लग्नामंदी कोणते लड्डू बनवते ? तेचें नांव काय तें मी विसरलें. "

" कां बरें ? आम्हीं बुंदी मोतीचूर—" मी त्या वात्रट पारशी मुलीला लाडवांची नामावली सांगूं लागलों.

" हां हां बुंदी बुंदी ! सुसबेननें बुंदीचे लड्डू दिले तर आमची कुलसुमची बिरयाणी बुडेल. अन् माझ्याबद्दल विचाराल तर माझा नवरा जनमला बी नही आहे. "

" म्हणजे ? " मी आश्चर्यानें विचारलें.

"म्हंजे सांगतें तमाला. एक मिसेस् झाली म्हणजे एक मिस् राहणार. पण आमाला लड्डू लई आवडते. बिरयाणी आमी रोज रोज खाते. मग कोण देतो आमाला लड्डू तें आमी पगतो" असें बोलून ती मिस्किलपणानें सुशीला व कुलसुमकडे पाहत फिदीफिदी हंसूं लागली. त्या दोघीजणी तिचे विनोदानें रागावून फणफणल्या होत्या. माझे मनांत एक अंधुक संशय चोरदिशीं डोकावला. इतक्यांत सुभेदार हरिश्चंद्राला घेऊन तेथें आला.

" सुभेदार, हरिश्चंद्राची तूं ओळख करून देण्याचे आधीं मी सुशीलेची व तुझी ओळख करून देतों. ही माझी मुलगी सुशीला. सुशीला, हा माझा परम मित्र सुभेदार गावडे."

सुशीलेनें सुभेदाराला अभिवादन केलें.

" सुशीलेचे वडील " असें म्हणून हरिश्चंद्रानें माझे पाय धरले. मी त्याला 'चिरंजीव हो' असा आशीर्वाद देऊन उठविलें.

' सुभेदारसाहेब,' सुशीला बोलूं लागली, " हरिश्चंद्ररावनीं माझेवर किती उपकार केलेत ! मी केव्हांच येऊन तुम्हांला भेटावयास पाहिजे होतें. पण खुद्द हरिश्चंद्रराव मनावर घेईनात, म्हणून मी येऊं शकलें नाहीं. तुमचे मुलानें माझे प्राण व अब्रू वांचवली आहे. मुसलमान गुंडांपासून त्यानें माझें रक्षण केलें. पुण्यांतील सर्व लोक त्याची तारीफ करीत आहेत. तो प्रसंग कोणताहि हिंदु विसरणार नाहीं."

सुभेदार व मी आश्चर्यचकित होऊन गेलों.

" सुशीले, तूं कसें नाहीं मला सांगितलें ? "

" त्याला पुष्कळ कारणें होतीं. मी मग सांगेन. "

माझे डोळ्यांत अश्रू उभे राहिले. मी गहिवरून गेल्यामुळें हरिश्चंद्राचे आभार कसे मानावेत हें मला सुचेना. त्याच्याशीं हस्तांदोलन करण्याचे-ऐवजीं मीं, त्याला कडकडून मिठी मारली. त्याचे जन्माचे रहस्यमय कथेनें व त्यानें सुशीलेला संकटांतून वांचवली या त्याच्या धाडसा-मुळें माझे हृदयांत त्याचेविषयीं आश्चर्य, दया, करुणा, वात्सल्य व आदर असे मनोविकार एकामागून एक उत्पन्न झाले. तुर्कांचें शौर्य आतांपर्यंत ऐकून माहीत होतें. मला आतां शूर तुर्क प्रत्यक्ष पाहावयास मिळाला. माझे अश्रूंचे ठिपके त्याचे साटिन डकचे कोटावर पडेल ते स्पष्ट दिसत होते. सत्य-नारायणाला मिलिटरींतील गावड्याचे कित्येक पेन्शनर दोस्त आले होते. हरिश्चंद्रानें शौर्यानें सुशीलेला सोडविल्याचें ऐकून भारतीय युद्धापेक्षांहि गेल्या मोठ्या युद्धांत भाग घेतलेल्या रणधुमाळांना कमालीचा आनंद वाटला. ते म्हणाले—

" खूप खूप क्या जवानीकी हिम्मत ! हम तो अबी बुढे बन गये. जवानोंका बातां सूनते सूनते खाली बैठणेवाले हम. हरिश्चंद्रजी, क्या हुवा तो हमकू सुनावतो सई ! "

हरिश्चंद्र विनयानें स्तब्ध राहिला. मग सुशीलेनें सर्व हकीकत रसभरित रीतीनें सांगितली. सर्व मिलिटरी पेन्शनर खूष होऊन आपले साफे डोलवीत होते. तो जरी हिंदूंचा धार्मिक उत्सव होता तरी त्याला सरळ रेषेंत चालत जाऊन कैक वेळां मृत्यूला भेटावयास गेलेले उमदे मुसलमान मिलिटरी पेन्शनर आले होते. त्यांना तसल्याच प्रकृतीच्या व मोठ्या धडधाकट हृदयाच्या एका खऱ्या बाणेदार हिंदूनें, एका निस्सीम भगवद्भक्तानें त्या धार्मिक समारंभाला बोलावलें होतें. त्यामुळें तेथें कोणाच्याहि धार्मिक भावना दुखवल्या जाण्याचा किंवा कोणाचीं हृदयें कंप पावण्याचा संभव नव्हता. सुशीला जेव्हां हरिश्चंद्र व मुसलमान गुंड यांच्या झटापटीचें वर्णन करूं लागली तेव्हां दोन मुसलमान वृद्ध मिलिटरी पेनशनर वीररसानें मेंदीनें रंगवलेल्या आपल्या दाढ्यांवरून हात फिरवूं लागले. सर्वजण मधूनमधून " क्या बहाद्दुरी, क्या बहाद्दुरी ! " असें ओरडत होते. सर्व हकीकत संपल्यावर ते दोन वृद्ध मुसलमान पेन्शनर ताडदिशीं उठून उभे राहिले. त्यांना गेल्या लढाईत मर्दुमकीबद्दल बिल्ले व फिती मिळाल्या होत्या, त्या त्यांच्या छातीवर लटकत होत्या. ते इतके जोरानें उठले कीं बिल्ले आणि फिती त्यांच्या छातींवर हदरल्या. " शेर तो शेर " असें म्हणून त्यांनीं हरिश्चंद्राची पाठ थोपटली. नंतर त्यांतील एकजणानें सुशीलेचे खांद्यावर हात ठेवला व तो दयार्द्र अंतःकरणानें म्हणाला, " इस बच्चोंने मुसलमानोंका क्या अपराध किया था ? क्या मुसलमानोंकू औरता लडक्या बच्चे नहीं है ? हमारा धर्म शूरोंके वास्ते है. इसमे ऐसे मवाली कैसे पैदा होते हैं ? "

तेथें सर्व धर्मांचे व समतोल डोक्याचे लोक जमले होते; त्या सर्वांना त्या बुढ्ढयाचे विचार पटले. सर्व मंडळी घरोघर गेली. थोडे खासे लोक मागें राहिले. मीं हरिश्चंद्राला बेताबेतानें त्याचे जन्माची हकीगत सांगितली. तो वृत्तांत श्रवण करतांना त्यानें आपलें मनोधैर्य यत्किंचित् चळूं दिलें नाहीं. उलट तोच सुभेदाराचें सांत्वन करूं लागला. तो म्हणाला--

" बाबा, तुमचे हातून माझी आई मारली गेली यांत तुमचा काय अपराध ? नकळत तुमचे हातून तो अपघात घडला. तो अपराध नसून अपघात होता. नाहीं तर एका अबलेवर तुम्हीं शस्त्र खास उचललें नसतें. सामान्य सैनिकाप्रमाणें तुम्ही मला तसेंच टाकून आलां असतां तर माझी काय स्थिति झाली असती ! प्रथम तुम्हीं माझी आई मारलीत खरी, पण नंतर ती दयारूपानें जिवंत केलीत आणि मला लहानाचें मोठें केलेंत. तुम्ही व गौरू आई हेच माझे या लोकीं आईबाप. "

" हरिश्चंद्रा, तुला सत्य न सांगतां फसविलें याबद्दल तूं मला क्षमा कर. मीं तुला फसविल्याबद्दल, माझा धर्म--"

सुभेदार बोलतांना अडखळला; व्हिक्टोरिया क्रॉस मिळविलेला योद्धा हे साधे शब्द उच्चारतांना कचरूं लागला.

" बाबा, तुमचा धर्म तो माझा धर्म. तुमची जात ती माझी जात. "

" माझी जात नीच आहे तरी देखील--"

" उच्च नीच या मनाच्या कल्पना आहेत. एकवीस कोटींची सात कोटींनीं गुलामी कबूल करण्याचे दिवस आतां गेले आहेत. हल्लीं शिक्षणाचें युग आहे. शिक्षणानें मिळालेला आमचा स्वर्ग कोण हिसकावून घेईल ? शिवाय, बाबा, हिंदूंचे चारी वर्णांत तुमचेइतकें श्रेष्ठ कोण आहे ? तुम्ही श्रेष्ठ आहांत म्हणून तुमची जात श्रेष्ठ आहे. माझी जात श्रेष्ठ आहे."

" हरिश्चन्द्रा, माझा धर्म कदाचित् तुला पाळतां येईल, कारण तुला फसवून मीं तो तुला शिकविला आहे. पण माझी जात कितीहि नीच असली तरी ती तुला मिळणार नाहीं. तुला जात-हिंदु कोणीहि म्हणणार नाहीं."

" कां नाहीं म्हणणार ?" बोलतांना हरिश्चंद्राच्या कपाळावरच्या शिरा तटाटून फुगल्या होत्या.

" कारण, हिंदु हा हिंदु आईबापांचे पोटीं जन्मावा लागतो. माझे महार देखील तूं मुसलमान आईबापाचे पोटीं जन्मला आहेस हें कळल्यावर तुला आपली मुलगी देणार नाहींत. " सुभेदार शांतपणें बोलला.

" पण मी हिंदु कसा नाहीं ? मी हिंदुधर्माचीं सर्व तत्त्वें पाळतों. माझा देव हिंदु आहे. दया, क्षमा, शांति, व सत्य तुम्हीं मला लहानपणापासून शिकविलें आहे. मी भगवद्गीता रोज वाचतों. हिंदुधर्माच्या भव्य

स्वरूपानें मी नम्र झालों आहें. त्यांतील प्रेम व भक्तीनें मी मोहित झालों आहें. त्या धर्माकरितां मी लढाई मारली. त्याचे अभिमानानें मी मुसलमानांचेवर अत्याचार केले. मनुष्याचे आत्म्याला ईश्वराचे सन्निध कोणती शक्ति नेत असेल तर त्याचे हृदयांत असलेली दया. हिंदु परमेश्वराचें स्वरूप दयामय आहे. परमेश्वराचें इतकें सुंदर ध्यान कोणत्याहि धर्मात नाहीं. अशा सुंदर धर्मातून तुम्ही मला घालवून देणार काय ? हिंदुधर्मातील भूतदयेनें सगळें विश्व व्यापलें आहे. त्यांतील थोडीशी दया तुम्ही मला कां दाखवीत नाहीं ? '' माझेकडे व सुशीलेकडे पाहून हरिश्चंद्र बोलत होता.

त्याचे वक्तृत्वानें मी तर भारून गेलों. क्षणभर मला तो जें जें बोलला तें तें सगळें सत्य आहे असें वाटलें. मला वाटलें, परधर्मीयांना आम्हीं हिंदुधर्मात येऊं देत नाहींत, ते आले तरी त्यांना जात-हिंदूंची जागा मिळत नाहीं त्यामुळें हिंदुधर्माचें केवढें नुकसान होत आहे ! याचा परिणाम असा होतो कीं, हिंदूंतील चांगले लोक परधर्मात जातात, पण परधर्मातील चांगले लोक मात्र आपल्या धर्मात येऊं शकत नाहींत. हिंदुधर्म संख्येनें व गुणांनीं घटतो. वाटेल तें होवो आपण हरिश्चंद्राला जात-हिंदु करवून घेण्याची मदत करणार. हल्लीं शुद्धि चळवळ निघाली आहे ती सर्वथैव योग्य आहे. ती हिंदुधर्माचा उद्धार करणारी आहे. "हरिश्चंद्रा, उद्यां आम्हीं हा प्रश्न शंकराचार्यांचे समोर ठेवणार आहोंत '' मी आवेशानें बोललों.

"मी पण हा प्रश्न हिंदुमहासभा व राष्ट्रसेवासंघ यांचेपुढें ठेवीन. कांहीं झालें तरी आम्ही त्याला मुसलमान होऊं देणार नाहीं. '' मानेला हिसडा देऊन अभिमानाच्या आवेशानें सुशीला बोलली.

"शंकराचार्य किंवा हिंदुमहासभा हा प्रश्न सोडवूं शकत नाहीं. कारण शंकराचार्य दुर्बल आहेत, त्यांचे हातांत सत्ता नाहीं, सामर्थ्य नाहीं. हिंदुमहासभा हिंदु लोकांना खूष करणारीं व त्यांना प्रिय असलेलीं मतें प्रतिपादन करणारी संस्था आहे. शुद्धि चळवळीनें फार झालें तर बाटलेल्या हिंदूंची एक निराळी जात होईल. सर्व हिंदु हें एक आहेत ही कल्पना मतप्रचारापुरती ठीक आहे. पण मुसलमानांसारखे हिंदु एकजात एक जिनसी बिनसांध्याचे नाहींत. त्यांत पावन केलेल्या किंवा परधर्मातून हिंदुधर्मात आलेल्या लोकांची जागा कोणती ? हिंदु त्यांना आपल्यासारखे एक-जातीचे

म्हणून वागवतील काय? तुम्ही माझेबरोबर रोटीबेटी व्यवहार कराल काय? हा प्रश्न प्रत्येक विचारी हिंदूनें मनावर घेऊन सोडवला पाहिजे. सुशीलेचे बाबा, आपण मघां जे उदार विचार बोलून दाखवलेत त्यानें धीर येऊन मी प्रश्न विचारतों याची माफी करा. मला हिंदु करून आपण जर सुशीलेचा हात माझे हातांत दिलात तर माझेसारखा भाग्यवान् प्राणी दुसरा कोणी नाहीं, असें मी आपल्याला समजेन."

माझे डोळ्यांसमोर एकदम चक्कर आल्यासारखें झालें. कैक विचार माझे डोक्यांतून भराभर गेले. कडेखांद्यावर लाड करून खेळवलेली माझी सुशीला महाराचे घरीं वाढलेल्या एका मुसलमानाच्या पोराला देऊन तिचें जन्माचें मातेरें मी करूं का? तिचे नशीबांत असेल तर आय्. सी. एस्. नवरा तिला एखाद-वेळीं फुकटांत मिळेल. आय्. सी. एस्. नाहीं तर निदान बी. ए., एम्.ए. तर खरा! कदाचित् हरिश्चंद्रापेक्षां सुंदरही मिळेल. पण मी तिला यवनाचे हवालीं करूं काय? नाहीं करणार. त्यानें तिला सोडवलें म्हणून काय झालें? उद्यां माझे शेजारीपाजारी व जातीचे लोक काय म्हणतील? मला व सुशीलेला जगांतून उठूनच गेलें पाहिजे. पण लगेच दुसरें मन मला सांगूं लागलें कीं, तूं हरिश्चंद्राचे तोंडाकडे तरी पहा. तो कसा भव्य, सुंदर, दिलदार व शूर आहे! शिवाय तो कमालीचा सभ्य व विद्वानहि आहे. सर्व हिंदु सभ्यता त्याचे रोमरोमांत बाणली आहे. त्यानें अशा परिस्थितींत हिंदु धर्माला मुकावें असा कोणता अपराध केला आहे? त्याच्यांत अशी कोणती उणीव आहे कीं तो तुझा जांवई होऊं नये? प्रत्यक्ष बादशाहा औरंगजेब संभाजी बाटला तर त्याला आपली मुलगी देण्यास तयार होता. हिंदुधर्माकरितां तूं हें कां करूं नयेस? तूं तर आतांपर्यंत लांब जीभ काढून हिंदु धर्माची बाजू घेऊन बोलत होतास. मग आतां माघार कां घेतोस? हें सर्व लिहिण्यास मला वेळ लागला त्याचे शतांशांत सर्व विचार माझे डोक्यांतून भराभर गेले. मी सुभेदाराकडे पाहिलें तर तो पण दिङ्मूढ होऊन हरिश्चंद्राकडे पाहत होता. तो एकदम ओरडून म्हणाला, "हरिश्चंद्रा, तूं हें काय म्हणतोस? अरे, माझा मित्र उच्च जातीचा हिंदु आहे आणि तूं त्याला अधर्म करावयास सांगतोस? शिवशिव!! पोरा, हा नाद सोडून दे. तूं आपले मनावरला ताबा सोडून देऊं नकोस."

हरिश्चंद्र खालीं मान घालून उभा होता. तो म्हणाला " माझी व सुशीलेची मैत्री जमली. त्याचें पुढें प्रेमांत रूपांतर झालें. त्याला माझा निरुपाय होता. तें प्रेम अगदीं दृढ झालें आहे. मला सुशीलेची प्राप्ति झाली नाहीं तर माझें आयुष्य सुखाचें जाणार नाहीं !'

" हरिश्चंद्रराव, तुम्हीं माझी सुटका केल्यानंतर तुमची माझी जी मैत्री जमली तिचा कॉलेजांतील विद्यार्थी भलभलता अर्थ करूं लागले. याच कारणामुळें मी तुमचे वडिलांकडे येण्याची उचल केली नाहीं व माझे पण वडिलांना तुमचें शौर्य सांगितलें नाहीं. तुमचेवर अनुरक्त असलेली व आतां तुमचे जातीची मैत्रीण कुलसुम ही देखील माझेबद्दल भलताच संशय घेऊं लागली. पण तुमच्या निष्पाप वर्तनामुळें मीं तें सहन केलें. पण तुमचे सौजन्यांत असली जहरी आशा होती अशी मला कल्पना नव्हती. मी उच्च वर्गाची हिंदु कुमारी, मुसलमानांची पूर्ण द्वेष्टी, तुमचेबरोबर कसें लग्न करीन ? तुम्ही वेडेपणा करूं नका. मी कुलसुमला चांगली ओळखतें. तुम्हीं तिचा त्याग केला तर ती जिवाचें बरेंवाईट करील. आतां तर तुम्हांला तिच्याशीं लग्न लावण्यास कोणतीच हरकत नाहीं." सुशीला भाषण करावें त्याप्रमाणें वक्तृत्वाचे शैलीनें बोलत होती. तिचे बोलण्यानें मला खूपच धीर आला.

" होय. कुलसुम केवळ मुसलमान आहे या गोष्टीमुळें चिडून जाऊन मीं तिचा धिःकार केला. आतां माझे डोळे उघडले आहेत. त्यामुळें मला तिची क्षमा मागून तिची समजूत काढली पाहिजे. पण आज मी पुष्कळ गोष्टी शिकलों. पहिली म्हणजे कट्टर हिंदु किंवा कट्टर मुसलमान त्याला जें माथेफिरूपणाचें शिक्षण मिळतें त्यामुळें बनतो. मीं बंगाली शाळेंत होतों त्या वेळीं तेथील हिंदु शिक्षकांनीं मुसलमानांचा इतिहास शिकवितांना हें विष माझे मनांत भरवून दिलें. दुसरें म्हणजे तुमचा रूढ हिंदुधर्म माणुसकीवर उभारलेला नाहीं. तुमच्याकरितां मी दंग्यांत कामा-करितां बाहेर पडलेल्या पोटार्थी गरीब मुसलमानांचीं निष्कारण डोकीं फोडलीं. आम्हीं ज्याप्रमाणें मुसलमानांना मारीत होतों त्याचप्रमाणें मुसलमानहि एकट्यादुकट्या हिंदूवर भ्याडपणानें हल्ला करीत. आतां या सगळ्या फाजिलपणाचा मला कंटाळा आला आहे. मीं कुलसुमशीं लग्न

लावावें हें तुम्हाला सुचवण्याचें कारण व अधिकार नाहीं. माझें डोकें फार दुखत आहे. तर आपण सर्वजण मला क्षमा करा व विश्रांति घेण्याकरितां मला जाण्याची परवानगी द्या." असें बोलून तो तेथून निघून गेला.

हरिश्चंद्राचे मनांत काय आहे याचा आम्हां कोणालाच थांग लागला नाहीं. त्या रात्रीं आम्हांला घरीं पोंचण्यास खूप उशीर झाला. मला रात्रभर झोंप आली नाहीं. माझे मनांत हिंदुधर्माच्या उद्धाराचे विचार होते. आत्म्याचें अमरत्व मानणारा, स्थलकालापलीकडील अनंतांत अंतर्धान पावलेल्या परमेश्वराचें ध्यान शिकवणारा, अध्यात्माचें चिंतन करणारा, जन्म-मृत्यु, सृष्टीची घटना-विघटना, ज्ञान, वैराग्य, दया, क्षमा, शांति यांचा विचार करणारा, 'मेलों तर स्वर्ग, जगलों तर पृथ्वीचा उपभोग' या वृत्तीनें रणांगणावर युद्धाचें आव्हान स्वीकारणारा, क्षात्रधर्मी, समाज-सत्तावादी उदार मनाचा साधासुधा हिंदुधर्म गेला कोठें ? तो सनातन धर्म फक्त शिवाशिवीचा, व्रतेंवैकल्याचा, जाती-पोटजातींचा झाला कसा ? मीं काल भ्याडपणा दाखवला तर खरा, पण सगळीकडे माझ्यासारखेच भ्याड भरलेले दिसत आहेत. त्यामुळें माझा निरुपाय आहे. मला पण भ्याडपणा केला पाहिजे. हरिश्चंद्राला कांहीं झालें तरी आपण हिंदूंतून जाऊं देऊं नये. हिंदूंचा पुढारी स्वामी सहलानंदामार्फत आपण जोराची खटपट करून हा प्रश्न श्रींच्या पुढें ठेवावा.

मी सकाळीं उठलों तर सकाळच्या सर्व वर्तमानपत्रांतून हरिश्चंद्राचे जन्मरहस्याचा स्फोट झालेला छापून आला होता. मी सहलानंदांना घेऊन सकाळीं सुभेदाराचे येथें गेलों. तेथें मुसलमान समाजाचे पुढारी हरि-श्चंद्राची भेट घेत होते. ते त्याचे मुसलमान बंधु म्हणून अभिनंदन करण्या-करितां हारतुरे, मेवामिठाईचीं ताटें, पोषाख असा नजराणा घेऊन आले होते. ते त्याला 'आपल्या धर्मात चल' असा आग्रह करीत होते. ते म्हणत होते:

"अरे, आपला धर्म किती चांगला आहे ! आपण सर्व एका अल्लाचीं लेंकरें आहोंत; गरीब-श्रीमंत, ब्राह्मण, शूद्र हा आपल्यांत भेद नाहीं. तुला एका थाळींत घेऊन आम्हीं सगळेजण जेवूं. हिंदु तुला अशा रीतीनें वागवतील काय ? कोणालाहि मुसलमान होतां येतें. जो मुसलमान होतो तो आमच्या धर्मात समरस होतो. आमच्या धर्मात मतस्वातंत्र्य आहे. वाटेल त्याला तो

सोडतां पण येतो. तो खुषीचा सौदा आहे. तसें हिंदूंचें नाहीं. ते दुसऱ्या धर्मातील लोकांना आपल्या धर्मात घेत नाहींत, व आपल्या धर्मातून दुसऱ्या धर्मात जाऊं पण देत नाहींत. स्वतःच्या धर्मातील लोकांना ते मुसलमानांपेक्षांहि वाईट रीतीनें वागवतात. त्यांच्यांत एकी, समता व सहनशीलपणा नाहीं. तूं हिंदु झालास तरी हिंदूंचा समाज व प्रेम तुला मिळणार नाहीं. हिंदु समाज अठरा ठिगळांच्या गोधडीसारखा आहे. मुसलमान समाज अखंड व बिनसांध्याचा आहे. दर पावलाला हिंदूंचा सोवळ्याचा कायदा निराळा आहे. आमच्यांत भेदाभेद नाहीं. तुला आवडेल त्या आमच्या मुलीशी तूं लग्न लाव. तुझी बीबी व्हावें म्हणून आमच्यांतल्या कितीतरी मुली तयार आहेत. तेव्हां चल, तूं आपल्या धर्मात ये. तो धर्म तुझाच आहे. आम्हीं काजीसाहेबांना कळवलें आहे. मशिदींत सर्व तयारी आहे."

आम्हीं मोठ्या मुष्किलीनें हरिश्चंद्राची गांठ घेतली. तो या सर्व कटकटीनें थकल्यासारखा दिसला. "दुपारीं दोन वाजतां श्रींचे पुढें तुझ्या धर्माचा प्रश्न ठेवण्याचें ठरलें आहे. तेव्हां तूं तेथें हजर रहा." असें आम्हीं त्याला सांगितलें. तो विचारांचे तंद्रींतून जागा झाल्यासारखा दिसला व "बरं" असें म्हणाला. आम्हीं तेथून पाय काढला व श्रींचे पुढें सर्व हिंदु समाज जमवण्याचें ठरवलें. आम्हीं हस्तपत्रकें काढून गांवांत वांटल्यामुळें दोहोंचे सुमारास श्रींच्या वाड्यांत खूप गर्दी जमूं लागली. पण हरिश्चंद्राचा पत्ता नाहीं. सहलानंदानें आपले स्वयंसेवक पाठवून सर्व मशिदी तपासल्या. त्याला भीति वाटत होती गोंड्याची टोपी, विजार व कबजा घालून हरिश्चंद्राची मूर्ति सुन्ता करून बाहेर पडलेली पाहण्याचें आपल्या नशिबीं खास आहे. अखेर मी व सहलानंद टांगा करून निघालों. कलेक्टर कचेरीच्या कंपौंडांत हरिश्चंद्र व कुलसुम दिसलीं.

"हरिश्चंद्रा, सर्व मंडळी वाट पाहत आहेत. श्रींचा देखील तुझ्याकरितां खोळंबा झाला आहे. तेव्हां तूं इकडे कशाला वेळ घालवतोस?" मी म्हणालों.

"ही लग्नाची खटपट अशीच त्रास देते." हरिश्चंद्रानें उत्तर केलें.

"लग्न कोणाचें?" मीं विचारलें.

" कुलसुमचें व माझें ! "

" म्हणजे तूं मुसलमान झालास देखील ! काय हो परशुराम, आपली सगळी मेहनत फुकट गेली ! " सहलानंद उतावीळपणानें म्हणाले.

हरिश्चंद्र हंसला.

" लग्नाला धर्मांतर करावें लागतें ?"

हरिश्चंद्र हें वाक्य म्हणत असतां कुलसुम गालांतल्या गालांत हंसत आपल्या जरतारी सँडलच्या चवड्यानें वाळूंत रेघा ओढीता होती.

" म्हणजे ! ही काय भानगड आहे ?" मीं विचारलें.

" ही भानगड नाहीं." हरिश्चंद्र गंभीरपणें बोलूं लागला. " मनुष्याच्या मनाच्या निसर्गनिर्मित वागणुकीचा हा निष्कर्ष आहे. मी हाडापेराचा मुसलमान असतांना मी विवक्षित परिस्थितींत वाढलों असल्यामुळें अज्ञानानें कुलसुमचा द्वेष करीत होतों. तिचे प्रेमाची अवहेलना करीत होतों. कारण ती केवळ मुसलमान होती म्हणून. त्या वेळीं कुलसुम मला मुसलमान हो असा आग्रह करीत होती. तेव्हां मला वाटवण्यापुरतेंच तिचें प्रेमाचें तें नाटक आहे, असें मला त्या वेळीं वाटलें. या अफाट मनुष्यांच्या सागरांत माझे हिंदु आईबापांशिवाय मला दुसरें कोण आहे ? माझे आईबाप सोडले तर फक्त कुलसुमनेंच मला माणुसकीची सहानुभूति दाखवली. माझे डोळे उघडले. या तीन माणसांशिवाय मला प्रेम व माणुसकी कुठेंच मिळाली नाहीं. त्यामुळें हा सगळा प्रकार पाहून तिचें धर्मवेड नाहींसें झालें आहे. हिंदुधर्माच्या बाहेर राहून आदरणीय अशीं हिंदुधर्मांचीं तत्त्वें पाळतां येतात. त्याला कोणाला अटकाव करतां येत नाहीं. कुलसुमनें माझ्या धर्माच्या यत्किंचित् आडवें यावयाचें नाहीं, असें कबूल केलें आहे. वास्तविक ज्ञानी मनुष्याला अमक्याच धर्माची जरूरी असते असें नाहीं. आम्हीं एकमेकांच्या धर्मांचे आड न येतां तत्त्ववेत्त्यांप्रमाणें सुंदर संसार करण्याचें ठरवलें आहे व सिव्हिल मॅरेज ॲक्टप्रमाणें आतांच लग्नाचे रजिस्ट्रेशनची नोटीस देऊन आलों आहोंत."

कुलसुमनें आपली मोटार बोलावली व दोघेंजण आम्हांला हिंदु पद्धतीचें अभिवादन करून निघून गेलीं. चौदा दिवसांनीं त्या दोघांचें लग्न लागल्याचें जाहीर झालें.

परवांचे दिवशीं मी हरिश्चंद्राचे बंगल्यावर गेलों होतों. पारलर रूममध्यें मौल्यवान् फर्निचर खूप होतें तें मी पाहत बसलों. हरिश्चंद्र टेबलावर पत्रें लिहीत होता. त्यानें मला थोडा वेळ थांबण्यास सांगितलें. त्याचे टेबलावर चंदनाच्या कृष्णाची एक सुंदर मूर्ति होती. म्हैसूरकडील कारागिराकडून बनवून कुलसुमनें ती मुद्दाम हरिश्चंद्राकरितां आणवली होती. तिचें नकास काम फार सुंदर होतें व ती मौल्यवान् असून तिची किंमतहि खूप असावी. चंदनाचा कृष्ण चंदनाचे धेनूवर रेळून चंदनाचा पावा बाजवितो आहे, असें तें दृश्य होतें. पलीकडे एका कोचावर कागदपत्राचे वेताचे पेटींत एक गोजिरवाणें मूल अंगावर घातलेला जाळीचा रुमाल पायानें उडवीत होतें. त्याचे पायाचे लाल चुटचुटीत तळवे सकाळचे उन्हांत चमकत होते. सुभेदारानें नुकत्याच जन्मलेल्या हरिश्चंद्राचें जें वर्णन केलें तें सर्व त्याला लागू पडत होतें. मला तो गनीमाचा दुसरा अवतार वाटला. इतक्यांत बकुळीचे फुलांची माळ घेऊन कुलसुम तेथें आली. मला पाहिल्याबरोबर तिनें स्मित करून मला नमस्कार केला व ती माळ कृष्णाचे मूर्तीचे गळ्यांत घातली.

"कुलसुमबाई, तुम्हांला काय माहीत कृष्णाला बकुळीचीं फुलें आवडतात म्हणून?" मीं विचारलें.

"मला काय बाई माहीत! पण हरिश्चंद्राची आवड म्हणून मी रोज माळ करून कृष्णाला घालतें. प्रेमाचा धर्म शिकवणारा तुमचा कृष्ण माझा पण देव होत चालला आहे. त्याच्या प्रसादाच्या पुण्याईचें फळ आम्हांला मिळालें आहे." तान्ह्या मुलाकडे पाहत कुलसुम म्हणाली.

लिहिण्याचें थांबवून हातांत टाक उचलून धरून हंसत हंसत रिव्हॉल्व्हिंग चेअरवरून हरिश्चंद्र वळला व तो म्हणाला,

"तुझ्या प्रेमधर्माचें पुराण तूं सर्वांना काय सांगतेस?"

त्या प्रेमळ जोडप्याला पाहून मला एक सात्त्विक आनंद होत होता, तरी पण विनोद उत्पन्न करण्याकरितां खवचटपणानें मी बोललों—

"हरिश्चंद्रा, तूं हिंदु धर्म पाळणारा, कुलसुम मुसलमान धर्म पाळणारी, मग या मुलाची जात कोणती?"

" या मुलाची जात हिंदी, धर्म स्वातंत्र्य. माझे आणि कुलसुमचे टेबला-वर गीता, कुराण वगैरे सर्व धर्मांचीं पुस्तकें आहेत. संख्येनें तेहतीस कोटि असतांना स्वतः नादान, दुर्बळ व कोत्या मनाचे राहून आपल्याआपल्यांत जातिमत्सर वाढवून हिंदु मुसलमान हे तट पाडण्याचे दिवस आतां गेले आहेत. धार्मिक वृत्तीनें राहून मनुष्याला धर्मातीत होतां येत नाहीं असं कां तुमचं मत आहे? धर्माचरणानें वागणाऱ्या विचारी मनुष्याच्या आयुष्यांत असा एक काळ येतोच कीं त्याला धर्माच्या कवचाची जरूरी राहत नाहीं. द्वेषावर उभारलेल्या राजकारणानें राष्ट्राचा चुराडा होतो, असें इतिहासानें आपणांस शिकविलें आहे. नुकतेंच स्पेनमध्यें काय झालें? तेव्हां यापुढें स्वातंत्र्य हाच आपला राष्ट्रधर्म, नाहीं, धर्म."

पुणें, १५-५-१९३९.

---

# घरकुल : : : : २

" हा पाहा जगूनं कसा हट्ट घेतला आहे तो ! जरा घरांत येऊन पाहावं." रमाबाई पुढल्या दारांतून तोंड काढून नाना गलथ्यांत उभे राहून कशाकडे तरी एकाग्रतेनें पाहत उभे होते त्यांना बोलल्या.

नाना गलथ्याच्या शिरोभागीं आलेल्या बालेखणीच्या खालच्या तक्त-पोशीला काळ्या चिमण्यांचा एक जोडा चिखलाचें घरकुल बांधीत होता त्याची गंमत पाहत उभे होते. त्या चिमण्या म्युनिसिपालिटीनें रस्त्यावर पाणी शिंपल्यामुळें जो चिखल झाला होता त्यांतील चिखल चोंचींत घेऊन बालेखणीपर्यंत येरझाऱ्या करीत होत्या व बालेखणीच्या खालच्या बाजूस नकशीचा कठडा लावला होता त्याच्या फळ्यांत आपलीं नखें रोवून, शत्रूसारखे नाना खालीं उभे होते त्यांच्याकडे एक डोळा लावून आपल्या घाटदार घरट्याचें बांधकाम झपाट्यानें आटपीत होत्या. आपल्या साध्या पांढऱ्या करड्या रंगाच्या चिमण्या असतात त्यांच्या निम्या एवढ्या देखील त्या मोठ्या नव्हत्या. मग त्यांच्या चोंची केवढ्या असतील आणि त्यांत चिखल तरी कितीसा मावणार ? घरटें बांधण्याचें त्यांचें काम तरी केव्हां संपणार ? पण त्या इवल्याशा चोंचींत मावेल एवढा चिखल घेऊन भुर्रभुर्र आवाज करीत आळीपाळीनें आपल्या घरट्याकडे येत होत्या. रस्त्यावरला चिखल वाळला कीं थोड्या अंतरावर एक सार्वजनिक नळ

होता तेथून त्या चिखल आणीत. आज सकाळपासून नानांना ही करमणूक पुरली होती.

ही गंमत पाहतांना ते मधूनमधून गंभीर होत होते. कसले बरे विचार त्यांच्या मनांत आले असावेत? कोणी बरें या पक्षांना घरें बांधण्याची उपजत बुद्धि दिली असावी? त्या जगन्नियंत्यानें काय? अशांसारखे विचार त्यांच्या मनांत असावेत. किंवा या क्षुद्र पक्ष्यांनीं सुद्धां उद्योग करून आपल्या बचड्यांकरितां दूरदर्शीपणानें सुखसोयींचें घर बांधावें व आपण मात्र मनुष्य असून देखील परावलंबी होऊन भाड्याच्या घरांत राहावें, अशासारखे विचार त्यांच्या मनांत खास आले असावेत. ते पक्षी दमले कीं गलथ्याच्या पलीकडील गाळ्यांत धुणीं वाळत घालण्याकरितां एक बांबूची काठी आडवी बांधली होती तिच्यावरती जाऊन बसत व पिसारा फुगवून चोंचीनें आपले पंख साफ करीत, किंवा चिंव-चिंव करून त्या दांडीवर थुईथुई नाचत. नाना या पाखरांच्या कौतुकांत इतके रमले होते कीं रमाबाई काय बोलल्या हें त्यांना ऐकूं गेलें नाहीं. पण जेव्हां जगूनें घरांत फारच दंगा उडवून दिला तेव्हा अंमळशानें ते घरांत आले.

जगू मोठमोठ्यानें रडत होता. जगूचा थोरला भाऊ दादा तेथें पाटीवर उदाहरणें सोडवीत होता, त्याला त्यांनीं विचारलें,

"कां रे हा रडतो?"

"हा म्हणतो, कीं त्याच्या वर्गांत रावबहादुर श्रीनिवास यांचा मुलगा आहे, तो जसा घोड्यावर बसून जातो तसा घोडा त्याला पाहिजे आहे."

नानांनीं जगूला जवळ ओढलें व आपल्या धोतराच्या ओच्यानें जगूचे डोळे पुसले. जगू अगदीं ओक्साबोक्शीं रडत होता. घोडा मिळाल्या-शिवाय तो रडावयाचा थांबेल असें चिन्ह दिसत नव्हतें.

"कसला घोडा पाहिजे तुला?" नाना जगूची समजूत काढूं लागले.

"मला किसनसारखा घोडा पाहिजे. पांढरा पांढरा. त्याची शेपूट मोठी हवी अन् त्याच्या तोंडांत तें कायससं असतं, तो तें असंअसं खात असतो (जगूनें घोडा लगाम कसा चावतो त्याची नक्कल तोंडांत पेन्सिल धरून करून दाखवली.) तसलं पण पाहिजे."

"आपण आणूं बरं. पण तूं घोड्याला बांधणार कुठं?"

" किसनसारखा आपल्याला बंगला पण घ्या म्हणजे आपण त्याला तिथं बांधूं. त्याच्या बंगल्यांत काय काय आहे—आरसे, कपाटं, खुर्च्या, टेबलं..."

नानांनीं एक दीर्घ निःश्वास सोडला. जगू रडावयाचा थांबला होता. त्याला सोडून त्यांनीं वर पाहिलें तों रमाबाईहि एक निःश्वास टाकीत त्यांच्या तोंडाकडे टक लावून पाहत होत्या. त्या पतिपत्नींची दृष्टादृष्ट झाल्याबरोबर दोघांनीं एकमेकांचे विचार जाणले. जणूं निःश्वासाच्या अदृश्य पुलावरून एकमेकांचे विचार एकमेकांच्या हृदयांत शिरले. रमाबाईच्या डोळ्यांत दोन टपोरे अश्रू तळवले. त्यांनीं बाजूला तोंड फिरविलें.

" घ्याल नं नाना आपल्याला मोठा बंगला ? मी त्यांत कशी शानदार बाग करीन."

" हो हो. अरे आपण मोठा बंगला घेऊं." नाना जगूच्या लवचिक कल्पनाशक्तीचा फायदा घेऊं लागले.

कर्म घेताहेत नाना बंगला ! नानांचें गेल्या तीन महिन्यांचें भाडें थकलें आहे हें काय जगूला—पोराला—माहीत ! पण त्या वेळेला नानांनाच काय, पण सत्यवचनी राम व प्रामाणिक हरिश्चंद्र यांना देखील खोटें बोलावें लागलें असतें.

तो दिवस आदितवारचा, सुटीचा होता. जेवणें झाल्यावर दुपारीं मुलें शेजारच्या घरीं खेळावयास गेलीं. रमाबाईच्या मनांत घराचा प्रश्न डंवचत होता. त्यांना नेहमीं वाटे, आपल्या मुलांबाळांना सत्तेचें घर असावें.

" म्हटलं, पाहावं आपल्याला एखादं घर. नाहींतर गावाबाहेर प्लॉट. त्यांत लहानसं झोपडं बांधलं कीं झालं. मुलांची हौस तरी फिटेल." रमा-बाईनीं संधि साधून नानांच्याजवळ मुलांच्या कल्याणाचा प्रश्न काढला.

त्यांना काय माहीत कीं नानांच्याहि डोक्यांत तोच प्रश्न थैमान घालीत आहे. घराला किती पैसे लागतील याचा हिशेब करतांना त्यांनीं ऑफिसची कितीतरी स्टेशनरी नासली होती. त्यांच्या ऑफिसमधील कितीतरी लोकांनीं हाउसिंग सोसायट्यांचे मेंबर होऊन घरें बांधलीं, बंगले घेतले. पण घरें कांहीं फुकट होत नाहींत. रस्त्यानें जातांना त्यांना किती तरी नवीं घरें बांधतांना दिसत, त्यांच्या सामानाची वाहतुक चालतांना दिसे,

चुन्याच्या घाण्या, सागवानी लाकडाच्या आणि वाशांच्या वखारी, शहाबादी फरशांचीं व बंगलोरी कौलांचीं गुदामें रस्त्यानें त्यांना लागत. बोहरीआळींतून जातांना खिळे, बिजागरी, स्क्रू, पत्रे, लोखंडी गज, कांबा, लगीतुळ्या यांनीं खच्चून भरलेलीं अरुंद पण लांब अशीं बोहऱ्यांचीं लोखंडी सामानाचीं दुकानें त्यांच्या वाटेवर होतीं. त्यांत बसून बोहरी चटाचट गिऱ्हाइकांना माल काढून देतांना ते रोज पाहत. त्यांना आश्चर्य वाटे, कीं अगणित व निरनिराळ्या तऱ्हेच्या मालानें भरलेल्या दुकानांतून बोहरी चटकन् माल कसा काढून देतो ! त्याची स्मरणशक्ति केवढी दांडगी असली पाहिजे. नाहींतर हें एवढें मोठें दुकान या तासलेल्या एवढ्याशा गोटयांत कसें राहावें ?

हेच नानांजवळ पैसे असते तर घर बांधण्याचीं सर्व यंत्रें आपोआप फिरूं लागलीं असतीं. मालकानें पैसे घेऊन प्लॉट विकला असता; रजिस्टरनें खरेदीचा कागद नोंदवला असता; बेलदारानें तोडी टाकल्या असत्या; कुंभारानें विटांच्या गाड्या आणून रिचल्या असत्या; गवंडी-सुतारांनीं बंगला बांधून शेवटीं वायरमननें इलेक्ट्रिक फिटिंग करून बंगल्याचें काम पुरें केलें असतें.

" आपल्याजवळ पैसे कुठं आहेत ?" नानांनीं रमाबाईच्या प्रश्नाला उत्तर दिलें.

" मी आपले सर्व दागदागिने देईन. शिवाय सरकारी कर्ज मिळतं तें काढावं." रमाबाईनीं आपली बायकी शहाणपणाची युक्ति सुचविली.

" तेवढ्यानं काय होणार आहे ? घर म्हणतं बांधून पाहा !" नाना वेळ मारून नेऊं लागले.

रमाबाईना नानांच्या सर्व अडचणी माहीत नव्हत्या. गरिबीच्या संसाराचा गाडा ओढतांना आपल्या पत्नीस वाईट वाटेल म्हणून त्यांनीं कितीतरी गोष्टी रमाबाईपासून लपवून ठेवल्या होत्या. उदाहरणार्थ–बिम्याचे हप्ते चुकल्यामुळें पॉलिसी बुडाली, पहिली गोष्ट. सावकारांनीं फिर्यादी लावून एकंदर पांचशें रुपयांचे दोन हुकूमनामे मिळविले त्याचे हप्ते आजपर्यंत चोरून भरले, ही दुसरी गोष्ट. आणि घरवाल्यानें तीन महिन्यांचें भाडें थकल्यामुळें येत्या पहिल्या तारखेस घर खालीं करण्याबद्दल नोटीस दिली,

ही तिसरी गोष्ट. पत्नीजवळ नाना खोटें बोलले तरी किती बोलणार ? त्यांनीं डोक्याला टोपी घातली व ते बाहेर जाण्यास निघाले.

" आज सदाशिवरावानं बोलावलं आहे " असें पत्नीला सांगून ते घराच्या बाहेर पडले. सदाशिवराव त्यांचे मित्र होते. पण त्यांनीं आज बोलावलें ही निव्वळ थाप होती. गरिबाला मान देऊन बोलवण्याचें कुणाचें खेटर अडलें आहे ! ते घरून निघाले ते कोठें जावें याचा विचार करूं लागले. जगबूड झाल्यावर पाण्याच्या वर वटवृक्षाचा शेंडा दिसतो, त्याप्रमाणें गरिबीच्या सागरांत त्यांना वेळ काढण्याला सदाशिवरावांच्या घराशिवाय आसरा दिसेना; म्हणून ते सदाशिवरावांच्या घरीं येऊन दाखल झाले. दाराच्या बाहेर जोड्यांचा खच पडला होता. आंत ब्रिजचा डाव चालला होता. सर्व मंडळी पत्त्यांत गर्क होती.

नानांची कोणी दखल केली नाहीं. नानांना वाटत होतें, मनुष्य हा समाजप्रिय प्राणी आहे. पण मनुष्यामनुष्यांत विजाती आहेत हें त्यांना माहीत नव्हतें. ते बसून कंटाळले. कोणी सिगारेटचे झुरके घेत होते, कोणी विडीवर दमबाजी करीत होते, कोणी आडवे पडून पानतंबाखू चघळीत होते. सदाशिवरावांना ही ब्याद इकडे कशाला आली असें वाटलें. त्यांनीं तोंडासमोर पत्ते धरले व त्यांवरून एकदां कपाळाला माकडासारख्या खूपशा आठ्या घालून नानांकडे पाहिलें. न बोलतां मनुष्याबद्दल तिरस्कार दर्शविण्याचे जेवढे मार्ग आहेत तेवढ्यांचा प्रयोग करून सदाशिवरावांनीं नानांस तेथून चालते होण्याबद्दल सूचना दिल्या. पण भोळसट व निष्कपटी नानांच्या त्या लक्षांत आल्या नाहींत. पत्त्याच्या डावांतील भिडू सतरंजीवर जोरजोरानें पानें आपटीत होते तें पाहून ते आपली करमणूक करून घेत होते. कारण ब्रिजमध्यें त्यांना कांहीं गम्य नव्हतें.

थोड्या वेळानें चहाच्या कपांनीं भरलेलीं ताटें आलीं. पण डाव रंगांत असल्यामुळें कोणीं त्यांकडे लक्ष दिलें नाहीं कीं कपाला हात लावला नाहीं. चहा निवून चालला होता, त्याला नानांचा काय उपाय ? पत्त्यांनीं, धुरानें व आरडाओरड्यानें त्यांचें डोकें उठलें होतें. कोणी 'त्यांना गरमगरम चहा घ्या' असें म्हटलें असतें तर त्यांनीं तें मंजूर केलें असतें. पण ब्रिजचें रबर होईपर्यंत कोणीं कांहीच बोललें नाहीं. मग सदाशिवरावांनीं नानांची दाद घेतली.

"घ्या हो चहा. खेळत नाहीं तुम्ही मला माहीत आहे; पण चहा घ्यायला काय हरकत आहे? का सोडला चहा तुम्हीं?"

नानांच्या मनांत चहा सोडला म्हणून म्हणावयाचें आलें होतें; पण त्यांच्या उठलेल्या डोक्यानें तो घ्यावयाचें ठरविलें व सर्वांच्या बरोबर तो गारगार चहा त्यांनीं घेतला. चहाचे कप रिकामे करून खालीं ठेवल्यावर वेळ फुकट जाईल म्हणून लगेच पिसणीला सुरुवात झाली व नानांनीं तेथून काढता पाय घेतला.

नानांचें डोकें दुखत होतें म्हणून ते गांवाच्या बाहेर एकान्ताच्या बाजूला तोंड करून निघाले. रस्त्यानें दगडा-विटांचीं घरें सारखीं लागून राहिलीं होतीं. जातांना नाना चाळ्यानें त्यांचे घरनंबर वाचीत होते, तों एके ठिकाणीं त्यांना १३०० घ. नं. दिसला. नानांचें आत्मगत सुरू झालें—"एका पेठेंत १३०० घरें तर एकोणीस पेठांत किती? शिवाय लष्कर, वानवडी, घोरपडी, खडकी बाजार, संगमवाडी वगैरे वगैरे ठिकाणीं वस्ती आहे ती निराळीच! पुण्याची लोकसंख्या दीडदोन लाख आहे. मग आपल्या कुटुंबाच्या वांटणीस एक घर कां येऊं नये? दोन नवरा-बायको व पांच मुलें अशीं आपल्या कुटुंबाला सात माणसें आहेत. आपणास एक घर अवश्य आहे. माझ्या ऑफिसच्या रस्त्यावर लखपति राहतो, त्याचीं पुण्यांत सातशें घरें आहेत. त्यानें राजवाड्यासारखें एक घर बांधावयास काढलें आहे. दर आठवड्याला कोणी तरी त्याला नवा प्लॅन देतो व तो बांधकाम पाडून दुसरें सुरू करतो. काय पैसा हा! पण त्याला या श्रीमंतीचा उपयोग काय? त्याला अग्निमांद्य असल्यामुळें जेवणाचें फक्त नेत्रसुख आहे. कानानें ऐकूं येत नाहीं, डोळ्यांनीं चांगलें दिसत नाहीं. व्याधिग्रस्त लखपतीच्या मांसाच्या गोळ्याला सातशें घरें कशाला पाहिजेत? त्यांतलें एक आपणास मिळालें तर?" पण नानांना डर्बी लॉटरीचें पहिलें बक्षिस आल्याशिवाय व त्याच दिवशीं लखपतीचें दिवाळें निघाल्याशिवाय हें शक्य नव्हतें.

नाना त्यांच्या आवडत्या रस्त्याला लागले. हा रस्ता बाभुळवनांतून गेला होता म्हणून त्या रस्त्याला एकान्त होता. परंतु कुठें आहे तें बाभुळ-वन? नाना त्या बाजूला दोनअडीच महिने फिरावयास आले नव्हते. त्यांचें

आवडतें बाभुळबन तुटून तेथें एक सुंदर घरांची कॉलनी उठत होती. कांहीं बंगले पुरे झाले होते. त्यांच्या घरभरणींचे नारळ ताजे लटकतांना दिसत होते. त्या बंगल्यांच्या कंपाउंडमधून बायकामुलें खुर्च्या टाकून नव्या घराच्या ऐटींत बसलीं होतीं. प्रत्येक नव्या बंगल्यावर रेडिओच्या डोलकाठ्यांनीं आनंदाच्या गुढ्या उभारल्या होत्या. रेडिओचीं सुस्वर गाणीं जिकडेतिकडे बंगल्यांतून चालू होतीं. चहूंकडे आनंदीआनंद होता. कांहीं बंगल्यांचें बांधकाम नुकतेंच पुरें झालें होतें. त्यांच्या परांच्या घरमालक आपल्या देखरेखीखालीं द्राक्षांचें पार्सल हळु-वार फोडावें त्याप्रमाणें सोडवून घेत होते. नानांना जिकडेतिकडे बंगले पाहून आश्चर्य वाटलें. गांवांतील सिताफळीच्या बागा, नंतर गांवाबाहेरील आंबराया, नंतर कॅनॉलखालच्या पेरूच्या बागा-बंगल्यांकरितां तुटल्या. आतां बाभुळबनावरती धाड आली काय! हें पुणें झपाट्यानें वाढत आहे! नाना टेकडीवर चढून विहंगमदृष्टीनें पाहूं लागले. जिकडेतिकडे नवीन बंगले! पुण्यावर चारहि बाजूंनीं नव्या बांधकामाचा हल्ला येत आहे. नाना परत आपल्या गांवांतील बिऱ्हाडाकडे यावयास निघाले. येतांना घरवाल्याच्या नोटिशीचा व घर सोडण्याचा प्रश्न त्यांच्या हृदयाला काचीत होता. घरीं त्रास देणाऱ्या मांजरांच्या पिल्लांना पोत्यांत घालून जसें गांवाबाहेर नेऊन सोडतात तसें नाना सर्व काळज्या आणि चिंतांचे विचार सोडण्या-करितां गावाबाहेर फिरावयास गेले होते; पण मांजरांच्या पिल्लांप्रमाणें काळज्या व चिंता त्यांच्या घरीं त्यांच्या आधींच येऊन पोंचल्या होत्या!

पांचसहा दिवसांत नानांनीं गांवाबाहेर एक स्वस्त जागा शोधून काढली; पण तेथून सेंट्रल बिल्डिंगमधील ऑफिस फार लांब होतें. नानांनीं तीच जागा कायम केली. दरम्यान पाखरांचें घरटें पुरें होत आलें होतें. पाखरांनीं पिसें, झाडांचे दोरे, काथ्या व कापूस जमवून घर-कुलाच्या आंतील बाजूस मऊमऊ गादी बनविण्याचें काम सुरू केलें होतें. पाखरांच्या घर बांधण्याच्या कामावर नानांची गलथ्यांतली मुकादमी मधून मधून चालू होतीच.

घरवाल्याचा दिवाणजी व भय्या मालकाच्या हुकुमाप्रमाणें वेळीं अवेळीं तगादा करीतच होते. दिवाणजी भाड्याकरितां भाडेकऱ्याचें सामान

भय्यामार्फत उठवून नेण्यांत पटाईत होता. मालकाचें सरकारांत खूप वजन असल्यामुळें भाडेकऱ्यांचें त्याच्यासमोर कांहीं चालत नसे. वेळेनुसार नानांनीं सामानाच्या गाडया भरल्या असत्या तर दिवाणजीनें त्या आड-वल्या असत्या व आळींत त्यांची शोभा केली असती. नानांनीं जाऊन मालकांची भेट घेतली.

नानांनीं नमस्कार केल्यावर मालक घरवाल्यांनीं आपल्या तिजोरीचें दार धाडकन् लावलें. तिजोरींत नोटांचा नुसता खच पडला होता. कांहीं नोटा तिजोरीच्या दारांत अडकून खालीं लोंबत होत्या.

" का आणलं का भाडं ? " घरवाल्यांनीं विचारलें.

" आपण नोटीस दिली घर खालीं करा. म्हणून, त्याबाबत आलों आहे मी. " नानांनीं नम्रपणें उत्तर दिलें.

"मग भाडं द्या व जागा खालीं करा. त्यांत कसलं संकट वाटतं तुम्हांला? तुम्हीं भाडं दिलं नाहीं तर आम्हीं काय करावयाचं ? आम्हांला देखील लोकांचे पैसे द्यायचे असतात. नळपट्टी, घरपट्टी, इन्कमटॅक्स आम्हांला कांहीं चुकत नाहीं. " घरवाले रेकत व कर्कश आवाजांत बोलत होते.

" जागा मी एकदोन दिवसांत खालीं करतों. पण भाडं मात्र माझ्याजवळ आतां द्यायला नाहीं. पुढच्या महिन्यांत निम्मं देईन व त्याच्या पुढल्या महिन्यांत बाकीचं देईन. एक महिना जास्त राहिलों तर निष्कारण भाडं माझ्या अंगावर चढेल. "

" मग प्रॉमेसरी नोट लिहून द्या व जागा खालीं करा. दिवाणजी, यांचं खातं पाडा. "

नानांनीं प्रॉमिसरी नोटीवर सही करून दिली व ते घरीं आले. त्यांना एक संकट टळल्यासारखें वाटलें. पण जागा सोडण्याचें, घरीं व शेजाऱ्यांजवळ कारण काय सांगावयाचें हें एक कोडें त्यांना पडलें. त्यांना शेजाऱ्यांची फिकीर नव्हती; पण आपल्या बायकोला खरा प्रकार कळला तर तिला दुःख होईल याची त्यांना काळजी वाटत होती. त्याच मनःस्थितींत तें ऑफिसांत गेलें व सबंध दिवस विचार करीत राहिले. संध्याकाळीं ऑफिस सुटतांना त्यांना युक्ति सुचली. गणेश पेठेंत त्यांनीं

हलवायाच्या दुकानांतून आठ आण्यांच्या तेलांत तळलेल्या स्वस्तांतल्या जिलब्या विकत घेतल्या व ते हर्षभरानें घरीं आले.

" पुडा कसला ? " रमाबाईनीं विचारलें.

"अग, एकदम पांच रुपये प्रमोशन ! " नाना हर्षभरानें ओरडले.

" वा ! आनंदाचा दिवस उगवला. सत्यनारायण घालूं या आपण. देव नवस केल्याबांचून पावला. "

नानांच्या उरांत जरा धडकी भरली.

"सध्यां नको सत्यनारायण. पुढील ग्रेड आपल्याला मिळाली म्हणजे घालूं."

संध्याकाळीं मुलें शाळेच्या ग्राउंडवरून आलीं. त्यांना ताटांतल्या जिलब्या दिसल्या व नानांचा पगार वाढलेला कळला. मग काय, सर्वांनी मिळून एकच हलकल्लोळ उडवला व घर डोक्यावर घेतलं ! दादाला क्रिकेटची बॅट पाहिजे होती, मनीला साडी, चिंगीला पोलका, रामूला फूटबॉल व जगूला घोडा. घर धनीण सगळयांच्या शेवटीं आपणाला लुगडें म्हणून सांगणार होती. आणि हें सगळें पहिल्या पगाराच्या पांच रुपयांत !

शेजारच्या गोविंदरावाला राहवेना. तो मागील चौकांत येऊन कानोसा घेऊं लागला. सर्व मुलें " नाना, नाना " करून नानांभोवतीं ओरडत होतीं. नाना व रमाबाई यांची कळी खूपच उमलली होती. या चिंतातुर जोडप्याच्या तोंडावर त्यांना अलीकडे कधीं आनंद दिसला नव्हता; तेव्हां काय भानगड चालली आहे याचा शोध करण्याकरितां तो नानांच्या घरांत आला व म्हणाला,

" एवढा आनंदीआनंद कसला चालला आहे ? "

" नानांचा पगार वाढला— ना–नां--चा प–गा–र वा–ढ–ला. पांच रुपये––पांच रुपये––पांच. " असें गाणें रचून मुलें नाचूं लागलीं.

गोविंदरावाचें तोंड खरकन् उतरलें व त्यानें एक मोठा आंवढा गिळला ! म्युनिसिपालिटीच्या टोल नाक्यावर गोविंदराव कारकून होता. गेल्या दहा वर्षांत त्याला तिसाचें एकतीस झाले नव्हते आणि या नान्याला एकदम पन्नासाचे पंचावन ? नानांच्या घरीं चिमूटभर मीठ देखील उसनें मिळत नाहीं म्हणून गोविंदराव लोकांत नानांची बदनामी करी. आतां पगाराच्या पहिल्याच पगारवाढीचें मीठ नानांनीं घेतलें तर दोन वर्षे त्यांना तें पुरेल.

" नाना, आज फीस्ट झाली पाहिजे. " गोविंदराव उसन्या आनंदानें ओरडला.

" झाली पाहिजे काय, आहेच. तुम्ही जेवायला राहा."

" काय आहे फीस्टला ? "

" जिलबी आहे, केशरी भात आहे." नाना वर्णन करूं लागले. वास्तविक केशरी भात कांहीं रमाबाईनीं केला नव्हता. तांदळांत हळद घालून त्यांनीं खिचडी बनवली होती.

" तुमचंआमचं या घरांतलं हें शेवटचं सहभोजन. " जेवतांना नाना म्हणाले.

" म्हणजे ? " गोविंदरावानें आश्चर्यानें विचारलें.

" आतां कोण या भिकारड्या घरांत राहतो ! गांवाच्या बाहेर मीं बंगला घेतला आहे. "

" कांहींतरीच सांगतां. " गोविंदरावाला वाटलें, नाना अर्ध्या हळकुंडानें पिवळे होऊन कांहींतरी बडबडत आहेत. बहुतेक पांच रुपये प्रमोशनच्या हर्षवायूनें त्यांचा मगज बिघडला आहे.

" उद्याची मीं रजा घेतली आहे. उद्यांच्या उद्यां मी सामान हालवणार आहें. तुम्ही फिरावयाला याल तिकडे तेव्हां या आमच्या बंगल्यांत. आमच्या बंगल्याचं नांव ' विनोदकुटि.' "

गोविंदरावाला मात्र आतां नानांनी खरेंच बंगला घेतला असें वाटून आणखी वाईट वाटूं लागलें. आतां नाना दूर गेल्यामुळें त्यांचीं गृहछिद्रें आपणांस दिसणार नाहींत व आपणाला चारचौघांत त्यांचें दिग्दर्शन करतां येणार नाहीं या विचारानें तो व्यथित झाला.

नानांनीं बंगल्याचें भरमसाट वर्णन केलें. त्यांत त्यांनीं खूपच अतिशयोक्ति केली. तें वर्णन ऐकून रमाबाई व मुलें यांना हर्षवायु होत होता. गोविंदरावाच्या पोटांत वर्णनामुळें दुखूं लागलें व त्याला जेव्हां तें सहन होईना तेव्हां कांहींतरी निमित्त करून तो पानावरून उठला व आंचवून घरीं गेला.

दुसरे दिवशीं सकाळीं नाना उठून पाहतात तों पक्ष्यांचें घरकुलाचें काम संपत आलें होतें. वरच्या बैठकीच्या कंगोऱ्याचा भाग तेवढा लिंपा-

बयाचा राहिला होता. एक पक्षी वरचा भाग मापाचा व्हावा म्हणून घरट्यांत अंडीं उबवतांना जसे पक्षी बसतात तसा बसला होता व दुसरा त्याला चिखल, पिसें वगैरे मालमसाला पुरवीत होता. दोघे पक्षी घरट्याचें राहिलेलें काम संपवण्यांत अगदीं गर्क होते. त्या दिवशीं संध्याकाळच्या आंत त्यांनीं घरट्याचें काम पुरें केलें असतें व दोघे पक्षी घरकुलांत सुखानें निजले असते. नानांना त्यांचें घरटें पुरें झालें म्हणून आनंद वाटला.

ते दिवस आगोठीच्या तोंडचे होते आणि आकाशांत ढग खूप जमले होते. रमाबाई लागबगीनें सामानसुमान आवरूं लागल्या. मुलें सुंदर बंगल्यांत राहावयास मिळणार म्हणून आनंदानें बागडत होतीं. नाना सामानाकरितां छकडे आणावयास गेले व तासाभरानें गाड्या व छकडे घेऊन आले. छकडेवाले सामान भरूं लागले. नाना गलथ्यांत उभे राहून त्यांना हुकूम करीत होते. छकडे भरून चालूं लागले. नानांच्या मनांत विचार आला, कीं आपणांस आपल्या बालेखणीखालच्या चिमुकल्या मित्रांना आतां सोडून जावें लागणार. त्यांना वाटलें होतें, कीं आज पावसाचीं तीं पाखरें जेव्हां आपल्या घरकुलांत गुबगुबीत झोंपतील तेव्हां आपणदेखील आपल्या नव्या घरांत तसेंच झोपूं. म्हणून त्यांनीं वरती पाहिलें. तेथें घरटें वगैरे कांहीं नसून तक्तपोशीला फक्त मातीचा डाग त्यांना दिसला. त्यांनीं खालीं पाहिलें तों घरकुलाचे तुकडे, पिसें व काथ्या अस्ताव्यस्त पडलेला दिसला. नानांच्या पोटांत चर्र झालें ! घरकुल मोडल्यामुळें तीं दुःखीकष्टी झालेलीं पाखरें दांडीवर स्वस्थ बसलीं होतीं.

नाना गहिंवरून गेले. आतां पावसाचें या पाखरांचें कसें होणार ? या गरिबांनीं उरापोटावर घरकुल तयार केलें तें कोणींतरी मोडून टाकलें. बहुतेक तें आपल्या मुलांनींच मोडलें असलें पाहिजे. पाखरांच्या खोड्या मुलें करतील म्हणून अद्याप मुलांना त्यांनीं पाखरें घरकुल बांधीत आहेत ही गोष्ट सांगितली नव्हती. हीं पाखरें दांडीवर बसून शोक करीत आहेत म्हणूनच त्यांनीं आपली चिंवचिंव थांबविली आहे. तीं आपल्या मुलांना मूक शाप तर देत नसतील ना ? वाचा असती तर हे मुके प्राणी काय बोलले असते ? असे विचार नानांच्या मनांतून येऊन गेले.

नानांनीं मुलांना विचारलें. मुलांनीं आपला अपराध ताबडतोब कबूल केला. आपलीं मुलें खरें बोलणारीं आहेत, त्यांनीं ताबडतोब अपराध कबूल केला म्हणून नानांना दुःखांत अंमळ बरें वाटलें. मुलांना समजूत आली नाहीं म्हणून त्यांनीं ही क्रूरता दाखविली कीं क्रूरता ही मानव-जातीच्या उत्क्रांतीच्या पूर्वायुष्यांतील रानटी मनाची आठवण आहे ? अल्लड व निष्पाप मुलें गरीब प्राण्यांना त्रास देऊन त्यांच्या वेदनांनीं आपली करमणूक कां करून घेतात ? बेडकाला दगड मारतांना किंवा चिवुराला दोरा बांधून त्याचे हाल करतांना त्यांना आनंद कां होतो ? मुलांच्या हृदयांतली हीच बालक्रूरता वाढत जाऊन त्यांचे गोविंदराव किंवा दिवाणजी, भय्या, घरवाले, चंगीजखान, तैमूरलंग असे प्राणी निर्माण होतात काय ? क्रूरता हा मानवांचा मूळ स्वभाव असून दया ही शिकवणुकीनें येते का ? नानांच्या डोक्यांत असले विचार चालले आहेत तों सुगृहिणी रमाबाई दांडी सोडण्याकरितां गलथ्यांत आल्या व पाखरें भुर्रदिशीं उडून गेलीं.

" राहूं दे ती दांडी. नको सोडूं. " नाना बोलले.

"कां?" दोन आण्यांची दांडी टाकून जाण्याचें रमाबाईच्या जिवावर आलें.

" आपल्या मागून कोणी बिऱ्हाडकरू आले तर त्यांला उपयोगी पडेल. " नानांनीं रमाबाईची समजूत केली.

पतीची आज्ञा स्वप्नांत देखील न उल्लंघणाऱ्या रमाबाई दांडी न सोडतां घरांत गेल्या. सर्व सामानसुमान घेऊन नाना मुलांमाणसांसह नव्या घरीं आले. गोविंदरावदेखील त्याचें टोलनाकें जवळ होतें तेथून तासाची सुट्टी घेऊन नानांच्या नव्या घरीं चक्कर मारून गेला. नानांचा बंगला नसून कच्च्या भेंड्याचें लहानसें झोपडें आहे, घर सुद्धां नाहीं व त्याला मागल्या बाजूला फक्त लहानसें परडें आहे एवढें पाहून त्याला समाधान वाटलें.

संध्याकाळीं चार वाजल्यापासून पावसाची झिमझिम सुरू झाली. नानांना कांहीं राहवेना. ते अंधार पडण्याच्या बेताला छत्री घेऊन घराच्या बाहेर पडले व त्यांनीं आपल्या जुन्या घरावरून चक्कर मारली. घराला दिवाणजीनें भलें मोठें टाळें लावलें होतें व मनुष्यवस्ती गेल्यामुळें घर अगदीं शून्य दिसत होतें. अंधुक उजेडांत त्यांना तीं पाखरें त्या दांडीवर एकमेकांना लगटून बसलेलीं दिसलीं. नानांचें हृदय पिळवटून निघालें. पुढें

दररोज संध्याकाळीं ते त्या बाजूनें चक्कर मारूं लागले ! सातआठ दिवस त्यांना तीं पाखरें नित्यानें दिसलीं. अजूनपर्यंत नवे बिऱ्हाडकरू आले नव्हते. त्यामुळें दांडीच्या वाटेस कोणीं गेलें नव्हतें. एके दिवशीं त्यांना पाखरें नेहमींच्या जागीं दिसलीं नाहींत म्हणून त्यांचें काय झालें हें पाहण्या-करितां दुसरे दिवशीं सकाळीं ते गोविंदरावांच्या समाचाराच्या निमित्तानें त्यांच्या घरीं गेले. गलश्यांत त्यांना पाखरांचीं काळीं पिसकुटें दिसलीं. आळींतल्या काळ्या बोक्यानें त्यांना खाऊन टाकलें असलें पाहिजे. नानांना वाटलें, आपणच अपराधी आहोंत. हें पाप आपल्या मुलांना लागणार तर नाहीं ना ? त्यांनी घरीं आल्यावर परमेश्वराची करुणा भाकली व आपल्या मुलांना क्षमा करण्याबद्दल त्यांनीं देवाची प्रार्थना केली.

ह्यानंतर थोड्या दिवसांची गोष्ट. नवीन घरांत नानांचें सगळें कुटुंब आजारी पडूं लागलें. आजूबाजूला पाण्याचीं डबकीं होतीं म्हणून त्या घराला डांस फार होते व नाना सुद्धां सगळ्यांना मलेरिया लागला. नानांच्या घरांत सुंठ, दालच्चिनी व गवती चहा यांच्या काढ्याचें पातेलें चुलीवर सारखें उकळूं लागलें. शिवाय नानांनीं कोयनेलवर सपाटा उडवला, त्यामुळें त्यांना कानांनीं कमी ऐकूं येऊं लागलें. मलेरियामुळें ते अगदीं अशक्त झाले व पिवळे फिकट दिसूं लागले. त्यांचे पायांत पाय गुंतूं लागले व ते मोठ्या कष्टानें ऑफिसमध्यें जाऊं लागले.

एके सकाळीं नऊ वाजतां लष्करमधील घोरपडीरोड ओलांडतांना एक मोटार सारखी हॉर्न वाजवीत मागाहून आली. तिचा आवाज नानांना ऐकूं गेला नसेल तेव्हां त्यांनीं बाजूला व्हावें म्हणून मोटारड्रायव्हर हॉर्न वाजवीत होता. मोटार हॉर्न वाजवीत अगदीं नजीक आली, तेव्हां नानांनीं एकदम दचकून उडी मारली व घाबरून ते समोरून येणाऱ्या मोटारीवर जाऊन आदळले ! दोन्ही मोटारी एकदम जागच्या जागीं थांबल्या. नाना मोटारीच्या बफरनें फेकले गेले. ते रस्त्यांत आडवे पडले. त्यांना खूप खरचटलें व पुष्कळ ठिकाणीं जखमा झाल्या. माराच्या आघातानें नाना बेशुद्ध पडले. दोन्ही मोटारींचे मालक मोटारींतून खालीं उतरले व त्यांनीं नानांना समोरच ससून हॉस्पिटल होतें त्यांत पोंचतें केलें. पोलिसला अपघाताची वर्दी हॉस्पिटलतर्फे जाऊन पोलिस सार्जंट अपघाताच्या ठिकाणीं ताबड-

तोब आले. मोटारी जेथल्या तेथें ठेवल्या होत्या. त्यांचा व अपघाताच्या जागेचा पोलिसांनीं पंचनामा केला. ज्या मोटारीनें नाना फेंकले गेले त्या मोटारीचे मालक मि. लेव्हिस्की हे एक रशियन एंजिनिअर होते. दुसरी मोटार कलकत्त्याचे पार्शी बॅरोनेट सर एदलजी यांची होती. सर एदलजींच्या साक्षीमुळें व रस्त्यावरील इतर सभ्य गृहस्थांच्या साक्षींमुळें नानांचा स्वत:चा निष्काळजीपणाच अपघाताला कारणीभूत झाला असें शाबीत झालें. त्यामुळे पोलिसांनीं मि. लेव्हिस्कीवर इंडिअन पिनलकोड किंवा मोटार व्हेइकल ॲक्टखालीं खटला भरला नाहीं.

मि. लेव्हिस्कींनीं नानांना इस्पितळांत पोंचवल्यावर हाउस-सर्जनना आपण नानांकरितां वाटेल तो पैसा खर्च करण्यास तयार आहोंत, तरी त्यांची व्यवस्था नीट ठेवावी असें सांगितलें व त्याप्रमाणें त्यांनीं खर्चाची तरतूद करून ठेवली. नानांना स्पेशल खोली देण्यांत आली व त्यांना फळफळावळ मिळेल अशी व्यवस्था लेव्हिस्कीनें केली. त्यांना इस्पितळांत आणल्या बरोबर ॲंटीटेट्यानसचें इंजेक्शन दिलें व त्यांच्या जखमांना उपचार केला. नानांच्या डाव्या मांडीचें वरच्या बाजूचें हाड मोडलें होतें व हाडांचा चुरा उडाला होता. कांहीं हाडांचे तुकडे मांस कापूस बाहेर आले होते. तें कॉंप्लेक्स फ्रॅक्चर होतें. नानांच्या लघवींत साखर सांपडली त्यामुळें व जखम विषारी ( Septic ) बनली होती म्हणून सर्जननें शस्त्रक्रिया करून नानांचा पाय मांडीपासून कापून काढण्याचें ठरविलें. त्यांना ऑपरेशन टेबलावर घातलें व गुंगीचें औषध देऊन त्यांचा पाय कापून काढला.

नाना शुद्धीवर आले. त्यांना खोलींत खाटेवर निजविलें होतें. ते नेहमींच्या संवयीप्रमाणें मांडी खाजवण्यास गेले तर आपली सबंध तंगडी तेथें नाहीं असें त्यांना आढळलें. मांडीच्या एका थोटुकाला बॅंडेजेस बांधलीं होतीं. वॉर्डबॉय जवळ उभा होता त्याला त्यांनीं विचारलें,

" माझी तंगडी ! "

" ती कापून काढली. " वॉर्डबॉयनें उत्तर दिलें.

" मला ती पाहूं तरी द्या ! "

" साहेब, ती भंग्यानं इद्यार्थ्यांना इकली. "

" विद्यार्थ्यांना माझी तंगडी विकली ! कशाकरितां ? "

" साहेब, त्यांना शाळेंत चिरफाडीचा अभ्यास करावयाचा असतो."

हताश होऊन नानांनीं डोळे मिटले. अरे अरे! माझी ती तंगडी! कितीतरी वेळां मीं तिला तेल लावून तिची मालीस केली आणि वस्त्रीनें घांसून तिला चकचकीत केली! माझ्या गरिबाची मोटारगाडीच ती. तिच्या जिवावर मीं दोन आण्यांचा टांगादेखील कधीं केला नाहीं. जिनें आपले पैसे वांचवून मुलांची फी व पुस्तकें भागवलीं—ती आपली खरी सहचारिणी गेली! आतां आपण ऑफिसला कसें जाणार? आपल्या नोकरीचें काय होणार! मुलांबाळांचें कसें चालणार? या विचाराच्या तंद्रींत नाना डोळे मिटून पडले.

त्यांनीं डोळे उघडले तों एक अनोळखी गृहस्थ त्यांच्या शेजारीं खुर्चीवर बसले होते, त्यांनीं स्मित करून नानांना नमस्कार केला.

" माझं नांव भिकाजीपंत बगळे. मी वकील आहें."

नानांना आश्चर्य वाटलें. इस्पितळांत वकिलांची नेमणूक कशाकरितां केली!: बगळे वकिलांच्या हातांत वकीलपत्राचा फॉर्म, एक रुपयाचा रेव्हेन्यु स्टँपचा कागद व कांहीं कोरे कागद होते. ते नानांच्याजवळ कैक वर्षांची ओळख असल्यासारखे बोलूं लागले.

" नाना, फक्त या कागदावर सह्या करा. तुम्हांला मी पन्नास हजार रुपये मिळवून देतों. त्याच्या व्याजांत तुम्हांला चैनीनं राहतां येईल. जागचं हालायला नको. हा कराराचा कागद वाचा व मीं खुणा केल्या त्या ठिकाणांवर फक्त सह्या करा."

" पन्नास हजार! मला कोण देणार?" नानांनीं विचारलें.

" लेव्हिस्की. मीं त्याची सर्व माहिती काढली आहे. तो कोट्याधीश आहे. तो रशियन राजघराण्यांतला पुरुष आहे. पण रशियांतील राज्यक्रान्तीनंतर तो तेथून पळाला. तो उत्तम इंजिनियर आहे. त्यानं आपलं जडजवाहिर विकलं. निरनिराळ्या राजधानींतल्या बँकांतून त्याच्या मोठाल्या ठेवी होत्या त्या त्यानं जमा केल्या व बांधकामाच्या कंत्राटाची त्यानं कंपनी काढली. जगांतील नामांकित इंजिनिअर त्याचे भागीदार आहेत. ते बारकींसारकीं कंत्राटें घेत नाहींत. मोठाले पूल, धरणं, टोलेजंग इमारती, गोद्या, गिरण्यांचीं बांधकामें अशीं मोठालीं कामें घेतात.

पन्नास हजारांच्या नोटा म्हणजे कचरा समजतो तो. नुकसानीचा दावा लावण्याचीच काय ती खोटी कीं पैसे तयार ! ”

“ पण दावा कसा लावणार ? स्टँपला पैसे ? ”

“ त्याची नको तुम्हांला काळजी. आपण दावा नादारींत आणूं, मग किरकोळ पैसे वर लागतील तेवढे खर्च केले म्हणजे झालं. ”

इतक्यांत रमाबाई मुलांना घेऊन तेथें आल्या. संध्याकाळीं सहाच्या-पुढें त्यांना अपघाताची बातमी कळली होती. नानांची अशी स्थिति झालेली पाहून सर्वजण ओक्साबोक्शीं रडूं लागलीं. आपणाला खाऊ आण-णारे, आपणाला कुरवाळून लाड करणार, आपणाला पुढ्यांत घेऊन निज-णारे आपले प्रेमळ नाना खाटेवर कां पडले ? त्यांचा पाय कोणीं कापला? ते आतां ऑफिसमध्यें कसे जाणार ? त्यांच्या अंगावर पडून मुलें रडूं लागलीं. जगू म्हणाला, “ नाना, मी तुम्हांला अस्सा धरून इपिसांत नेईन. ” सर्वजण गहिंवरलीं.

“ बाळांनो, नाना आतां बरे होतील; पण तुम्हीं त्यांचा पाय दुखवूं नका. ” नर्सनें मुलांना ओढून बाजूला केलें.

नर्स फारच प्रेमळ होती. तिनें रमाबाईचें खूपच सांत्वन केलें. थोड्या वेळानें सर्वजण शांत झाल्यावर नाना रमाबाईना म्हणाले :

“ हे वकीलसाहेब काय म्हणतात तें नीट ऐक. ते म्हणतात, मोटारीच्या मालकावर नुकसानीचा पन्नास हजारांचा दावा लावला कीं पैसे मिळतील. सध्यां नादारींत दावा लावायचा. किरकोळ पैसे मात्र खर्चाला लागतील. ”

“ किती लागतील ? ” रमाबाईनीं विचारलें.

“ सध्यां दोनएकशें रुपये लागतील. ” वकीलसाहेबांनीं उत्तर दिलें.

“ मी दागिने मोडून पैसे देईन. पण आपण दावा जिंकूं अशी खात्री करा. नाहींतर आम्हां गरिबांचे पैसे फुकट जातील.”

“ त्याची नको तुम्हांला काळजी. माझा एकहि दावा अद्याप फुकट गेला नाहीं. शिवाय मला खात्री असल्याशिवाय मी फुकट कसा राबेन ?”

“ दावा किती दिवस चालणार ? ” रमाबाईनीं विचारलें.

“ नेहमींच्या पद्धतीनं वर्षसहा महिन्यांत निकाल होतो. पण ह्या दाव्याचं समन्स लागायची खोटी कीं साहेब चेक देईल. ”

बकिलांनीं नानांच्या ठिकठिकाणीं सह्या घेतल्या. स्टँपावर वकील-फीचा करार लिहिला होता.

" हा करार कसला ! " नानांनीं विचारलें.

" तुम्हांला जे पैसे मिळतील त्यांतील चौथाई माझ्या मेहनतीबाबत तुम्हांला द्यावी लागेल, त्याचा हा करार. पण तुम्हीं हें कुठं बोलूं नका; नाहींतर कोर्ट नादारी दावा काढून टाकील. "

" आम्हांला पन्नास हजार मिळाले तर आम्ही बक्षिसाचे आणखी एक हजार तुम्हांला जास्त देऊं. " रमाबाई बोलल्या. त्यांच्या बोलण्यांत इतका उदारपणा व इतकी सचोटी दिसत होती कीं, वकीलसाहेब तर त्यामुळें सर्दच झाले.

यानंतर थोडया दिवसांनीं नानांना कळलें कीं, आपली इस्पितळांत एवढी बडदास्त चालली आहे, आपणांस फळफळावळ मिळत आहे याचें कारण लेव्हिस्की. मग त्यांनीं वकिलाला बोलावणें पाठवलें. वकील-साहेब इस्पितळांत आले.

" मला दावा लावायचा नाहीं. " नाना म्हणाले.

" कां ?" वकील घाबरून विचारूं लागले.

" माझ्यावर उपकार करणाऱ्या माणसावर मी दावा लावूं ? पहा माझी लेव्हिस्कीनं कशी व्यवस्था ठेवली आहे ती! दररोज मुंबईहून फोनवर माझी चौकशी करतो तो."

वकीलसाहेब जरा घोटाळ्यांत पडले. "टेवील नाहींतर काय ! व्यापारी आहे तो. पन्नास हजार वांचविण्याकरितां शेंपांचशें खर्चील नाहींतर काय करील ? त्याचा फायदा आहे त्यांत."

बगळे बकिलांनीं पुष्कळ युक्तिवाद सांगून नानांची समजूत काढली व दाव्याचा बेत कायम करविला. पण नानांनीं इस्पितळांतील अधिकाऱ्यांना सांगून लेव्हिस्कीची सरबराई घेण्याचें बंद केलें. त्यामुळें नानांचा किरकोळ खर्च बराच झाला.

* * *

ऑपरेशन झाल्यानंतर दोनतीन दिवसांनीं नानांना खूप ताप येऊं लागला. तापाच्या भरांत नानांना त्या पाखरांचीं स्वप्नें पडत. त्यांना सोन्याच्या घरट्यांत रत्नांचीं पांखरें दिसत. त्या पाखरांनीं सोन्याचा वाडा बांधला असून त्याला खूप रत्नजडित कोंदणें बनवलीं आहेत. त्यांत निरनिराळ्या रंगांच्या रत्नांच्या जडावाचीं व मीन्याच्या रंगांचीं रत्नजडित पांखरें राहत असून त्यांचे थवेच्या थवे आकाशांत उडत आहेत. त्या पक्ष्यांना माणसाची भाषा येत असून नानांशीं ते बोलत आहेत अशीं स्वप्नें नानांना पडूं लागलीं. "नानासाहेब, तुम्हीं पृथ्वीवरचीं माणसं घरं कशाला बांधतां ?" पांखरांनीं नानांना विचारलें.

"आम्हांला राहायला—आमच्या मुलांना राहायला." नानांनीं उत्तर केलें.

"कशाला तुम्ही घरं बांधतां ? पैशाशिवाय तुमचीं घरं होत नाहींत. पैसा कमी पडला कीं तीं मोडतात. सरकारचे, म्युनिसिपालिटीचे पैसे दिले नाहींत कीं तीं गहाण पडतात, विकलीं जातात. घरें बांधलीं कीं त्यांच्या-बद्दल हक्कांचे दावे सुरू होतात. त्यांच्या दुरुस्तीला दुप्पट पैसा खर्च करावा लागतो. ज्या दिवशीं तुम्हीं घराचा पाया घेतां त्या दिवसापासून तुमच्या मागं घराचा घोर सुरू होतो. घराचे प्लॅन, म्युनिसिपालिटच्यिा परवानग्या, व्यापाऱ्यांचीं बिलं वगैरे भागवतांना तुम्हांला कर्जे काढावीं लागतात. आणि एवढं करून त्यांत राहून घराचा उपभोग कोण घेतो ? तर पायांतील घुशी, माचणींतील उंदीर, भिंतींतील ढेकूण, कपाटांतील झुरळं नी माळ्यावरचीं उदमांजरं. तुम्हांला पै भाडं न देतां हे प्राणी फुकट तुमच्या घरांत राहतात व तुम्हीं मेलांत कीं तुमच्या घराचा पूर्ण ताबा घेतात. मग मुलांबाळांना घरं कुठून राहणार ? तुम्हांला वाटतं तुम्हीं अमर आहांत. पण मृत्यु तुमच्या छातीपुढं छाती काढून समांतर पावलं टाकीत चाललेला असतो. नाना, गमावलेल्या तंगडींतून तूं बंगला बांधणार काय ? तो उठेल काय ? खरं बोल, खरं बोलं."

* * *

एक महिना झाला. नाना बरे होऊन त्यांना हॉस्पिटलमधून डिस्चार्ज मिळाला. नानांचा दावा दाखल होऊन त्यांना नादारींत दावा चालवण्याची परवानगी मिळाली. मि. लेब्हिस्कीनें स्वत: होऊन समन्स घेतलें व कैफियत

दिली. त्याच्या आधीं त्यानें आपले वकील खानबहादुर जहांगिरजी यांच्याजवळ विचारविनिमय केला. खानबहादुरांनीं दाव्यांत कांहीं अर्थ नाहीं असा त्यांना सल्ला दिला. तरी पण 'आपण त्या गरीब बिचाऱ्या कारकुनाला दहा हजार रुपये देऊं, तरी तुम्ही त्याप्रमाणें त्याच्या वकिलास विचारा,' असें लेव्हिस्कीनें खानबहादुरांना सांगितलें. त्याप्रमाणें खानबहादुरांनीं बगळे वकिलांना विचारलें. वकिलांच्या तोंडाला पाणी सुटलें. त्यांना वाटलं, दावा आपल्यासारखा होणार, म्हणून तर पैसे देण्याचें आमिष खानबहादुर दाखवीत आहेत. तरी दाव्याची पन्नास हजारांची रकम कां बुडवा? त्यांना वाटलें, आपल्या पश्चात् नानांना खानबहादुरांनीं विचारलें तर ते लगेच हो म्हणतील, म्हणून त्यांनीं नानांना व रमाबाईंना खूप पढवून ठेवलें. नाना आपल्या सल्ल्याशिवाय कांहीं करणार नाहींत अशी बगळ्यांची खात्री झाली तेव्हां त्यांनीं खानबहादुरांना शेवटचें सांगितलें कीं, 'पन्नास हजारांशिवाय दावा तुटणें शक्य नाहीं.' ते म्हणाले—

"तीन टक्क्यांचे सरकारी रोखे घेतले कीं महिना शंभर रुपये यावयास निदान चाळीस हजार रुपये तरी लागतील. माझ्या अशिलाला हल्लीं पन्नास रुपये मिळत आहेत. तो पेन्शनीपर्यंत दीडशें रुपये पगारावर जाईल. तरी सगळ्या पगाराची सरासरी महिना शंभर रुपये पडते. शिवाय मानसिक त्रासाकरितां दहा हजारांची मागणी केली आहे. तेव्हां वादीचा क्लेम अगदीं न्याय्य आहे."

खानबहादुरांनीं लेव्हिस्कीला कळवलें कीं, आपसांत समजूत होत नाहीं. कोर्टानें पुराव्याची तारीख नेमली. आतांपर्यंत रमाबाईंचे सर्व दागिने बगळ्यांनीं सराफ आळींत नेऊन विकले तरी खर्च भागला नाहीं. उलट कर्ज काढावें लागलें. अलीकडे नानांना कोर्टापर्यंत येण्याजाण्याचें भाडें वकिलांनाच द्यावें लागे. कारण नानांजवळ पैसा बिलकुल राहिला नव्हता. नानांच्या वरिष्ठानें त्यांना हलकें काम देण्याची मेहेरबानगी दाखवली होती, पण नेहमींच्या खर्चाच्यावर नानांना दहा रुपये टांग्याला लागूं लागले.

अखेर पुराव्याची तारीख उजाडली. कोर्टांत नानांचा दावा उभा राहिला. लेव्हिस्कीनें शंभरा शंभरांच्या दहा हजारांच्या शंभर नोटांचें पुडकें कोर्टांत वकिलांच्या टेबलावर ठेवलें व नानांना ते पैसे घेण्यास

शेवटची संधि दिली. त्याला वाटलें, नोटांचें पुडकें पाहिलें कीं नाना कबूल होतील. म्हणून चेक न देतां त्यानें नोटा आणल्या. कोर्टानेंदेखील नानांना समजावलें. बगळे नानांच्या कानाला लागले व नानांनीं दावा चालवावयाचा असें कोर्टाला सांगितलें. लेव्हिस्की बगळे वकिलाकडे तिरस्कार व आश्चर्य यांच्या मिश्रणाच्या नजरेनें पाहत होता. त्यानें खानबहादुरांना विचारलें,

" हा कोण इसम मध्यें लुडबुडतो आहे ? याचा काय संबंध ? " खानबहादुर लेव्हिस्कीच्या कानाशीं लागले व त्यांनीं त्याला कांहींतरी सांगितलें. लेव्हिस्की हंसला.

" मग चालूं द्या दावा. " लेव्हिस्की म्हणाला.

पण त्याला नानांनीं पैसे घेतले नाहींत म्हणून फार वाईट वाटलेलें दिसलें.

दावा सुरू झाला. घरीं रमाबाई हात जोडून देवापुढें दाव्यांत यश मिळावें म्हणून प्रार्थना करीत बसल्या होत्या. दाव्याची सुनावणी सर्व दिवसभर चालली. सर एदलजींची जबानी व सार्जंटचा पंचनामा ग्राह्य मानून कोर्टानें फैसला केला व दाव्याचा निकाल नानांच्याविरुद्ध खर्चासुद्धां झाला. बगळे अगदीं खट्टू झाले ! लेव्हिस्कीनें आपणांस वादीचा खर्च नको असें कोर्टाला कळविलें. कोर्टानें त्याप्रमाणें वकिलांना पुराशिस देण्यास सांगितलें. बगळे नानांना न विचारतां कोर्टांतून नाहींसे झाले.

दर खेपेला बगळे आणि त्यांचे कारकून नानांना टांग्यांत नेऊन बसवीत. या खेपेला कोर्टाच्या शिपायांना नानांची दया आली व त्यांनीं नानांना टांग्यांत नेऊन बसविलें. दाव्याचा निकाल आपल्यासारखा होणार म्हणून मुलेंदेखील शाळेंतून लवकर घरीं आलीं होतीं. कारण बगळ्यांचीं व नानांचीं खलबतें होत तीं मुलें ऐकत. बगळे नानांना व रमाबाईना हरभऱ्याच्या झाडावर चढवीत व मुलें तें सर्व ऐकून मनांत मांडे खात. त्यांच्यांत दाव्याबद्दल चर्चा चाले व पैजा लागत. दाव्याचा निकाल आपल्यासारखा झाला कीं आपण श्रीमंत होणार, आपला स्वत:चा बंगला होणार, मग आपण श्रीमंतांचीं मुलें जशीं वागतात तसें वागावयाचें, असें मुलांनीं आपसांत ठरवलें. जगू तर रेसमधला घोडाच विकत घेणार होता !

नानांचा टांगा त्यांच्या घरासमोर येऊन उभा राहिला. या खेपेला रमाबाईना टांग्याचें भाडें शेजाऱ्याकडून उसने पैसे आणून द्यावें लागलें !

तेव्हांच रमाबाई मनांत चरकल्या. नानांना उचलून आंत आणल्यावर मुलें विचारूं लागलीं :

" नाना, काय झालं ? काय झालं ? "

नाना कांहींच बोलले नाहींत. ते खिन्न दिसले. रमाबाई मनांत तरकल्या कीं दाव्याचा निकाल विरुद्ध झाला.म्हणून त्या मुलांच्या अंगावर ओरडल्या,

" मुलांना कोर्टाच्या पंचायती कशाला पाहिजेत ? तुम्हीं खेळायला जा."

मुलें मुकाट्यानें खेळण्यासाठीं गेलीं. मग रमाबाईनीं विचारलें,

" काय निकाल झाला ? "

" आपला दावा कोर्टानें काढून टाकला. " नाना उत्तरले.

" आपण पैसे खर्च केले ते फुकट गेले ? "

" होय. शिवाय कोर्टानं आपल्यावर खर्च बसवला तो निराळा ! पण साहेब उदार म्हणून त्यानं तो सोडून दिला. चांगला बिचारा दहा हजार रुपये देत होता; पण आपण जन्मदरिद्री ! आपल्या नशिबांत ते कुठून असणार ? "

" कांहीं घाबरूं नका. लोकांचं देणंमागणं आपण फेडून टाकूं. आपली गरिबी व आपल्या गरिबींतला आनंद तर कुणाला हिरावून घेतां येत नाहीं ना ? "

रमाबाई म्हणजे नानांची एक खरीखुरी सुखसंचारक कंपनीच होती. सुखसंचारक कंपनींत जशा विलक्षण वस्तु असतात, एकाच वस्तूच्या निरनिराळ्या वस्तु बनतात व त्यांचा निरनिराळा उपयोग होतो—मिटली कीं पेटी, उघडली कीं बाजा, निरनिराळे आवाज काढणारी शिटी, त्रिकालदर्शी आरसा— अशांसारखीच चांगल्या अर्थानें रमाबाईची गत होती. काम करतांना त्या सुगृहिणी, सल्ल्याचे वेळीं मित्र, आजारीपणांत प्रेमळ नर्स तर हिशेबांत चोख अकौंटंट, पैशांत प्रामाणिक ठेवीची बँक अशी सद्गुणी स्त्री नानांना लाभली होती. त्यांनीं नानांना खूप धीर दिला होता.

रात्रीं मुलें खेळून आलीं. रमाबाईनीं त्यांना सर्व हकीकत सांगितली. सर्व कुटुंबखर्च कमी करून लोकांचें देणें-मागणें कसें देतां येईल याचा तें कुटुंब विचार करीत बसलें. इतक्यांत त्यांच्या घरांत मोटारीचा उजेड आला व एक मोटार त्यांच्या दाराशीं घर्रर्र असा आवाज करीत उभी राहिली.

सर्व कुटुंब घाबरून पुढल्या दारांत जमा झालें. एक साहेब मोटारींतून उतरला. हो, लेव्हिस्कीच तो. नानांना वाटलें, रात्रीं हा आपल्याकडे कशाला आला ? आपला बेत बदलून दाव्याच्या खर्चाचे पैसे मागतो कीं काय ? दाव्यांतील फिर्याद-अर्जीत नानांचा पत्ता लिहिला होता त्यावरून तो अचूक नानांच्या घरीं आला. त्याला बेतार्चेच इंग्रजी येत होतें. नानांनीं त्याला आदरानें आंत बोलावलें. दादाचा पुस्तकांचा खोका शेजारीं होता तो उभा करून नानांनीं त्याची खुर्ची केली व त्यावर त्याला बसावयास सांगितलें.

"माझ्या गरिबाच्या झोपडींत आपण कशाला आलांत ?" नानांनीं लेव्हिस्कीला विचारलें. सर्व मुलें घाबरून आजूबाजूला उभीं राहिलीं. दादा कान टवकारून इंग्रजींतलें बोलणें ऐकत होता. त्याला एखाददुसरा इंग्रजी शब्द कळत होता. रमाबाई दाराच्या फटींतून चिंतातुर नजरेनें पाहत होत्या.

"मि. देशपांडे, मला वाईट वाटतं, कीं तुम्ही दावा हरलांत. पण कांहीं हरकत नाहीं. चीअर अप्. तुमच्या कुटुंबाला किती माणसं आहेत ?"

"पांच मुलं व दोन नवराबायको अशीं सात माणसं आहेत माझ्या कुटुंबाला, साहेब !"

"तुम्हाला पगार किती मिळतो ?" लेव्हिस्कीनें विचारलें.

"पन्नास रुपये." नानांनीं उत्तर दिलें.

"पन्नास रुपयांत सात माणसं काय करीत असतील ?" लेव्हिस्की आपणाशींच पुटपुटत होता. त्यानें सर्व बाजूंना नजर फिरवून नानांच्या घराचें सूक्ष्म निरीक्षण केलें. एका कोपऱ्यांत फाटक्यातुटक्या वळकट्या रचल्या होत्या. वरती दांडीवर वाळत घातलेले कपडे लोंबत होते. एका कंदिलाभोंवतीं मुलांचीं पुस्तकें पडलीं होतीं. एका घडवंचीवर धान्याचे डबे वगैरे किरकोळ सामान सांठवलें होतें. एकंदरींत सर्व घरांत दारिद्र्याचें चित्र दिसत होतें. लेव्हिस्की खूप गंभीर झाला व त्याचे डोळे दयेनें व कारुण्यानें आकुंचित झाले. तो बोलूं लागला,

"हिंदुस्थानची आणि रशियाची स्थिति एके काळीं सारखी होती. हिंदुस्थानांतील लोक सनदशीर म्हणून इकडे राज्यक्रांति झाली नाहीं. आमच्या लोकांनीं समाजक्रांति करून आम्हांला रशियाबाहेर हांकून काढलं तें

योग्यच होतं. पण तें असूं द्या. मि. देशपांडे. तुम्हांला केवढा बंगला पुरेल ? मला मलायांत मोठं कंत्राट मिळालं आहे. लोणावळ्यास माझं खूप सामानसुमान उरलं आहे. उद्यां एक प्लॉट विकत घ्या. मी पैसे देईन. माझे इंजिनिअर तुम्हांला बांधकामांत मदत करतील. कांहीं सामान लागलं तर ते पुरवतील. पण कशाला, मीच तुम्हांला प्लॅन काढून देतों. मला एक कोरा कागद व पेन्सिल मिळेल का ! ''

नानांच्या घरांत कोरा कागद नव्हता. मग दादाच्या एक्सरसाइज बुकांतील मधलीं पानें फाडलीं व त्यावर लेविस्की बंगल्याचा प्लॅन काढूं लागला.

'' तुम्हांला सहा बेडरूम्स्, एक किचन, एक पार्लर रूम पाहिजे. पुढं लाटिसचा व्हरांडा ठेवूं. मि. देशपांडे, बाथरूम कोणत्या स्टाइलची पाहिजे तुम्हाला ? इंडियांत जर मला कुठं सुख लागलं असेल तर बाथरूममधें. ''

नानांना बाथरूमची कल्पना भोपळ्याएवढी होती. ते मागील बाजूस फुटलेल्या जात्याच्या तळीवर बसून एका कडी गेलेल्या घंगाळांतून तपेली तपेलीनें पाणी अंगावर घेऊन भुडभुडगंगा करीत. अखेर लेव्हिस्कीनें आपल्या मताप्रमाणें दुमजली बंगल्याचा प्लॅन आंखला. दादा कागदावर उजेड पडावा म्हणून कंदील घेऊन उभा होता.

'' मि. देशपांडे, या प्लॅनला शोभेल असा प्लॉट शोधून काढूं व तो विकत घेऊं. लगेच बंगल्याचं काम सुरू करूं. शिवाय माझ्या मताप्रमाणं तुम्हांला दीडशें रुपये व्याजाचे येतील एवढ्या ह्या सरकारी प्रॉमिसरी नोटा मी तुमच्या हवालीं करतों. पण एका अटीवर. खानबहादुर जहांगिरजी म्हणत होते, कीं तुम्हीं वकिलाला दाव्यांतील वसूल होणाऱ्या रकमेंतून चौथा भाग लिहून दिला आहे. खरी गोष्ट आहे ? ''

'' हो, खरी आहे. '' नाना मंत्रानें भारल्यासारखे बोलले.

''आतां तो दावा खलास झाला. वकिलाचा तुमचा संबंध कांहींच राहिला नाहीं. यांतील एक कवडी देखील वकिलाला जातां कामा नये, या अटीवर मी तुम्हाला पैसे देतों. वुइश यू गुडनाइट. '' असें म्हणून लेव्हिस्की निघून गेला. नाना त्याच्या जागीं खोक्यावर बसले. सरकारी प्रॉमिसरी नोटांचें पुडकें त्यांनीं मांडीवर ठेवलें व साहेबाशीं त्यांचें काय संभाषण झालें तें त्यांनीं आश्चर्यानें त्यांच्याभोंवतीं गोळा झालेल्या कुटुंबाला सांगितलें.

दादा, जगू, मनी वगैरे मुलें त्या कंदिलाच्या उजेडांत आपलीं चिमुकलीं तोंडें पुढें करून नाना काय सांगतात तें ऐकत होतीं. त्या तोंडांच्या प्रभावळीमुळें नानांचें तोंड झांकून गेलें होतें. रमाबाई हनुवटीवर बोट ठेवून उभ्या होत्या. त्या रात्रीं त्या गरीब कुटुंबांतलीं सगळ्यांचीं हृदयें आनंदानें भरून गेलीं. दुष्काळांत अवचित् खूप पाऊस पडून पर्जन्यमापक यंत्रें भरून सांडलीं तर त्याचं माप कोण घेणार !

दुसरे दिवशीं लेव्हिस्की नानांकडे आला व त्यानें त्यांना आपल्या मोटारींत घेतलें, एक सुंदर प्लॉट नदीच्या पलीकडे शोधून काढला व तो विकत घेतला. लगेच लेव्हिस्कीच्या लोणावळ्याच्या स्टाफच्या देखरेखीखालीं बंगल्याचें काम सुरू झालें. लेव्हिस्की जरी मलायांत ताबडतोब जाणार होता तरी त्याचा स्टाफ मागें काम शिल्लक राहिलें होतें तें पुरें करून मग जाणार होता. तें काम आणखी दोनतीन महिने चालणार होतें. लोणावळ्याहून सामानाच्या लॉऱ्या भरून आल्या व नानांच्या बंगल्याचें काम झपाट्यानें सुरू झालें. लेव्हिस्की बंगल्याचें काम लागीं लावून मलायाला निघून गेला. जातांना त्यानें आपली ॲडलर नानांना देऊन टाकली.

दोनअडीच महिन्यांत नानांचा बंगला तयार झाला. नानांच्या अपघाताची व लेव्हिस्कीच्या उदारपणाची बातमी गांवांत पसरली. ती अर्थात् पहिल्याप्रथम गोविंदरावाला कळली. अलीकडे गोविंदराव लष्करांत फिरण्याकरितां जाऊं लागला होता. साहेबांच्या मोटारींनीं कितीहि मोठ्यानें हॉर्न वाजवला तरी तो रेसभर बाजूला सरकत नसे. एकदोन साहेबांनीं तर मोटारी थांबवून खालीं उतरून गोविंदरावाला बुटांच्या लाथांनीं मारलें. त्यानें तो आजारी पडला, पण अजून लष्करांत फिरण्याचा नाद त्यानें सोडला नव्हता.

अलीकडे सदाशिवराव व गोविंदराव यांना नानांबद्दल कमालीचें मित्रप्रेम आलें होतें. ते सहकुटुंब नानांच्या मोटारींतून रोज त्यांच्या घरीं येत. त्यांचीं मुलें मोटारींतून खालीं उतरत नसत. मोटारीच्या गिरद्यांत बोटें घालून त्या फाडणें, हँडल्स वेडींवांकडीं फिरविणें, हॉर्न सारखा वाजविणें असले चाळे करून तीं त्यांना भंडावून सोडीत. तरी त्या प्रेमळ दांपत्यापैकीं त्यांना कोणी हरकत घेत नसे. रमाबाई मोटार हांकण्यास शिकल्या.

आळींतील मुलांना त्यांची मोटार आपल्या घरचीच अशी वाटे आणि मोटार रस्त्यावर आली, कीं आळींतील मुलें मोटारींत येऊन बसत. मग नाना आणि रमाबाई त्यांना गांवाबाहेर फिरवून आणीत. तसेंच आपले नातेवाईकांच्या व मित्रांच्या मुलांनाहि तीं फिरावयास नेत व सगळ्यांना आपल्या मोटारीचें सुख उपभोगण्यास देत. त्यांनीं गारिबी पुरी पाहिली होती. ते ती विसरणें शक्य नव्हते. ज्या श्रीमंतीचा त्यांना तिटकारा असे व ज्या श्रीमंतीला एकच वेळ भुलून ते कोर्टाची पायरी चढले ती श्रीमंती त्यांच्या कचाट्यांत सांपडल्याबरोबर गरिबांकरितां तिला राबवण्याचें त्यांनीं ठरवलें होतें.

नानांचा बंगला पुरा झाला. कंपाउंडांत सुंदर मांडव घालून घरभरणीचा टोलेजंग बेत करण्याचा दिवस नानांनीं ठरवला. ऑफिसमधील शिपायांपासून तों वरिष्ठांपर्यंत सर्व लोक, नातेवाईक, मित्रमंडळी वगैरे यच्चयावत् लोकांना आमंत्रणें गेलीं व सर्व मंडळी ठरल्या वेळीं मांडवांत जमली. नानांच्या ऑफिसमधील सर्व मंडळींनीं त्या समारंभांत उत्साहानें भाग घेतला व मोठे ऑफिसर्सदेखील त्या दिवशीं हलकीं कामें करतांना संकोच मानीत नव्हते. त्याचें कारण नानांची सत्त्वस्थ, प्रेमळ, निष्कपटी गरिबी व सालसपणा. जेवण्याच्या आधीं बंगल्याला नांव काय द्यावयाचें हा प्रश्न निघाला. एकजण म्हणाला, "बंगला हवाशीर आहे म्हणून त्याला 'पवन' नांव द्यावं." दुसरा म्हणाला, "नानांच्या अपघाताच्या स्मरणार्थ त्याला 'अपघात' असं नांव द्यावं." मंडळींनीं तें खोडून काढलें कीं, पवन फारच संस्कृत व अपघात फारच वाईट, कारण त्यामुळें त्या भयाण अपघाताची निष्कारण आठवण राहील. गोविंदरावाला नानांचें वैभव सारखें डाचत होतें. तो चटकन् बोलून गेलाः

"'तंगडीप्रसाद' नांव ठेवा, तंगडीप्रसाद! काय अगदीं यथार्थ नांव होईल!"

"हे कोण विद्वान्?" म्हणून सर्वांनीं त्यांची टर उडविली. अखेर नाना म्हणाले,

"मीं बंगल्याला नांव देऊनहि टाकलं आहे व त्याचा संगमरवरी बोर्ड करून ठेवला आहे."

" काय नांव ठेवलं ? काय नांव ठेवलं ? " म्हणून सर्व विचारूं लागले.

" अरे रामा, ती संगमरवराची शिळ आण पाहूं. "

रामानें शिळ आणली आणि तिच्यावरचें तांबडें अलवान सोडलें. लोक उत्सुकतेनें पाहतात तों काय ! बंगल्याचें नांव–" घरकुल " होतें.

" हें कसलं नांव ठेवलंत, नाना ? आमची एक कमिटी नेमा. आम्ही छानदार नांव शोधून काढूं. "

" छे छे ! बंगल्याचं नांव बदलणं शक्य नाहीं. " नाना निश्चयाच्या स्वरानें बोलले. मग नानांनीं पक्ष्यांच्या घरकुलाची गोष्ट सांगितली व तेंच नांव बंगल्याला कां द्यावयाचें याचें प्रयोजन सांगितलें. सर्व मंडळींना अर्थात् तें नांव मग आवडलें.

पुढें मंडळी जेवणाच्या पंगतीचं पाटपाणी करण्यास लागली. त्यांत एक सोंवळ्याची पंगत होती. नाना म्हणाले,

" मी सुद्धां सोवळं नेसून येतों. " रामूनें त्यांना उचलून त्यांच्या खोलींत नेलें. पानें वाढलीं आणि पंगतीची मंडळी नानांची वाट पाहूं लागली. नाना कांहीं लवकर येईनात. त्यांना निरोपावर निरोप गेले. त्यांनीं आपल्या खोलीला आंतून कडी लावून घेतली होती, आंतून त्यांनीं बोला-वण्यास आलेल्या लोकांना जाण्यास व पानांवर बसण्यास सांगितलें. रामूलाहि जाण्यास सांगितलें. बोलावण्यास आलेले लोक म्हणाले, " आम्हांलाहि जा म्हणतां, रामूलाहि पाठवून देतां, मग तुम्हांला आणील कोण ? "

" त्याची नको तुम्हांला काळजी. मी दोन मिनिटांत येतों. तुम्ही पानांवर जाऊन बसा. "

ते लोक गेले व आपल्या पानांवर जाऊन बसले. सर्व मंडळी नानांची वाट पाहत बसली. नाना उशीर कां करताहेत हें कोणाला कळेना ! इतक्यांत सूटबूट घातलेले नाना, स्वतः होऊन व्हरांड्याच्या पायऱ्या उत-रून येतांना दिसले ! त्यांचे दोन्ही पाय शाबूत असून ते सरळ पूर्वी जसे चालत होते तसे आपल्या पायांनीं चालत मंडपांत आले. चालण्याची ढब, उभें राहण्याची लकब अगदीं निर्दोष. जणूं काय नानांचा पाय कापून काढ-लाच नव्हता. गोविंदराव तर सर्दच होऊन गेला ! त्याला वाटलें, कोयनेल खाऊन नानांचे एकदां कान फुटले तसा त्यांचा पायहि फुटला कीं काय !

नानांनीं पंगतींतून सर्वांना चालून दाखविलें. नव्या पायांचा इतिहास सांगितला. लेव्हिस्कीनें इस्पितळांतच डॉक्टराकडून त्यांच्या पायाचीं मापें घेऊन ठेवलीं होतीं. कारण त्याच्या मनांत जर्मनींतून कृत्रिम पाय आणून तो नानांना बक्षीस द्यावयाचा होता. त्याची रिसीट त्यांना एक महिन्यापूर्वी आली होती. पायाचें पार्सेल त्यांनीं स्टेशनावरून बंगल्यांत परस्पर आणून ठेवलें व नवा पाय बसवून चालण्याची प्रॅक्टिस बंगल्यावरच घेतली. त्यांच्या घरच्या मंडळींना ही वार्ता नव्हती. हा पाय बसवून वर विजार घातली कीं पाय खोटा आहे असें बिलकुल ओळखूं येत नाहीं. घरभरणीच्या दिवशीं सर्वांना चकित करण्याकरितां नानांनीं गुप्तता राखली होती.

सर्वांना वाटलें नानांनीं खरोखरच लेगबाउंडरी मारली !

पुणें, ३०–५–१९३९.

---

## साधना : : : : ३

पुष्कळ दिवसांची गोष्ट. नर्मदा नदीच्या काठीं शिवसंगम नांवाचें एक गांव होतें. त्या गांवापासून थोड्या अंतरावर रमणभाईनें आपलें वाण-सौद्याचें दुकान काढलें होतें. दुकानचे पुढील बाजूनें नर्मदाप्रदक्षिणेचा रस्ता गेला होता. त्या रस्त्यानें साधुसंत, तडीतापसी, बैरागी, गोसावी, उदासी, महंत यांचे मेळे जात. जरूर पडल्यास ते रमणच्या दुकानांत माल घेण्यास येत, त्याच्या अंगणांत बसत, गप्पागोष्टी करीत, गांजा, चरस, मदत यांचे चिलमीवर दम मारीत किंवा विसांवा घेण्याला रात्रभर अंगणांतच वस्ती करीत. त्यांच्यांत कोणी खरेखुरे साधूहि असत. पण रमण सर्वांची सारखीच सेवा करी व त्यांना जातांना आदरपूर्वक निरोप देई.

रस्त्याच्या पलीकडून नर्मदानदीचा प्रवाह वाहत होता. रमणच्या दुकानांतून प्रवाह स्पष्ट दिसे. गिऱ्हाइक नसलें म्हणजे रमण प्रवाहांतील भोंवरे, दिवसभर डुंबणारीं बदकें, पाणकोंबडीं पाहून किंवा नर्मदेचा कलरव ऐकून आपली करमणूक करून घेई. चातुर्मासांत तर बरसातीच्या आवाजांत पोथी वाचणें व मधूनमधून लाल पाण्यानें तुडुंब भरलेल्या नर्मदेकडे पाहणें किंवा तिच्यांतून वाहत जाणारीं झाडें मोजणें याशिवाय रमणला दुसरी करमणूक नसे. मग रात्रीं तो पावसाच्या झोडींत नर्मदेच्या खळखळाटाच्या गर्जनेंत झोंपीं जाई.

याप्रमाणें आपल्या उमरींतील लगभग तीस वर्षें त्यानें त्या दुकानांत घालवलीं. तो सतरा वर्षांचा होता तेव्हां त्यानें गुजरात सोडली होती. दुकानाशेजारींच त्याची लहानशी शेती होती व तींत तो व त्याची बायको मणिबाई खूप मेहनत करीत. दुकानांतील नफ्यांतून उरणारें कापडचोपड, किराणा माल व शेतीचें उत्पन्न यांचेवर तो आपल्या कुटुंबाचा गुजराणा करी.

तो महत्त्वाकांक्षी पुरुष नव्हता. त्यामुळें त्यानें आपल्या दुकानचा व्याप वाढवण्याचा कधींच प्रयत्न केला नव्हता. शिवाय नर्मदातटाकीं, डोंगराळ प्रदेशांत, रानावनांत असलेलें तें खेडेंगांव व्यापार वाढवण्यास योग्य नव्हतें. अर्थात् त्याचें दुकान सुरुवातीला जेवढें होतें तेवढेंच राहिलें. कालामुळें दुकानांत जेवढा फरक झाला असेल तेवढाच. दुकानच्या मापांना खोमणे पडले, तराजूचा अर्धा काटा तुटला, वजनें घासून गेलीं. पण रमण भरपूर माप घाली. त्यामुळें कोणी तक्रार करीत नसत. म्हणून त्यानें त्या जिनसा बदलल्या नव्हत्या.

दुकानाच्या मानानें त्याचेवर कालचक्राचा बिलकुल फरक झाला नव्हता, असें म्हटलें तरी चालेल. जडतत्त्वांच्या नियमांना अनुसरून त्याचे शरीरधर्मांत थोडासा फरक पडला होता. बाकी त्याच्या मनाची झीज बिलकुल झाली नव्हती. तो जरी व्यापारी होता तरी हिशेबी नव्हता. घेण्या-देण्यांचे विचारांनीं त्याची झोंप कधींच बिघडली नव्हती. सूडाचे किंवा द्वेषाचे विचारांनीं त्याला कधींच जाग्रण पडलें नव्हतें. सट्टा, लोभ, महत्त्वाकांक्षा यांचे विचारांनीं त्याचे डोक्याचीं चक्रें चुकून सुद्धां फिरलीं नव्हतीं. त्यांचे हृत्-कमलांत समाधानाचें राज्य होतें व जेव्हां तो आपले किलकिले डोळे करून नर्मदेच्या प्रवाहाकडे तास न् तास पाहत बसे तेव्हां त्याचे अंतःकरणांत असलेल्या साम्राज्याचा तो सार्वभौम राजा आहे असें पाहणारांस वाटे. तो पक्का वैष्णव होता. नरसी मेहताचें पद म्हटल्याशिवाय तो कधीं झोंपीं गेला नाहीं.

त्यांतल्या त्यांत जेव्हां त्याचा सुस्वभावी, सुंदर व आज्ञाधारक मुलगा हेमचंद्र वयांत येऊन त्याचा धंदा-रोजगार पाहूं लागला, तेव्हां तर त्याच्या सुखा-समाधानावर हर्षाचा कळस चढला. आणि खरोखरच हेमचंद्र सोन्याप्रमाणें पीतवर्ण व चंद्राप्रमाणें हंसतमुख होता. त्याचा बांधा मध्यम व

रेखीव होता. तो अत्यंत सुकुमार होता. जेव्हां तो आपल्या गिऱ्हाइकाला आपल्या वडिलांकडे पाहत पाहत पसाभर धान्य जास्त देई, तेव्हां रमण सम्मतिदर्शक मानेला हिसडा मारी व प्रोत्साहनपूर्वक हंसे.

रमणनें हेमचंद्राचें नुकतेंच लग्न केलें होतें व भिल्लांचीं वाद्यें लावून सुनेला वाजत गाजत घरीं आणलें होतें. त्यानें तिचें नांव मृदुला ठेवलें. मृदुला खरोखरच जाईच्या फुलाप्रमाणें नाजुक होती. तिच्या पावलांवरचीं कुंकवाचीं पेळवें व स्वस्तिकें अद्याप धुऊन निघालीं नव्हतीं.

मृदुला देखील हेमचंद्रासारखी पीत गौर होती. रमणच्या झोपडींत ते नवपरिणीत वधूवर एकाच डहाळीवरच्या सोनचांफ्याच्या फुलांच्या जोडीप्रमाणें दिसत. उषःकालीं सडासंमार्जन घालतांना मृदुलेचीं मेंदीनें रंगलेलीं नखें व आळत्यानें रंगवलेले हातापायांचे तळवे चमचम करीत व रमणच्या अंगणांत दोन उषःकाल झाले आहेत असें वाटे. मृदुलेच्या सौंदर्यकिरणांनीं रमणचें घर भरून गेलें. सकाळीं उठल्यापासून रात्रीं निजेपर्यंत मृदुलेच्या पायांतील पैंजणांचे आवाज नर्मदेच्या कलरवाशीं बरोबरी करीत राहत.

मृदुला जशी सुंदर तशी सुशील होती. ती सर्वदा सासू-सासऱ्यांच्या सेवेला तत्पर असे. हेमचंद्राला ती देव समजे. रमण आतांपर्यंत हेमचंद्राला आपल्या सुखाचा ठेवा, धन, दौलत समजे. मृदुला आल्या दिवसापासून त्याला आपली दौलत दुप्पट झाल्यासारखें वाटूं लागलें होतें.

मृदुला सासरीं आल्यानंतर थोड्या दिवसांनीं एके दिवशीं सकाळीं दोन घोड्यांचा एक शिग्राम रमणच्या दुकानासमोर येऊन उभा राहिला. त्याचे टपावर व कोचनमच्या शेजारीं बेडिंग, पगड्यांचे वाटोळे डबे, वेतकामाच्या फराळाच्या पेट्या, कातडी पेट्या, मेवामिठाईच्या फळफळावळाच्या करंड्या, पाण्याचे खुजे, चंबू असें सामान गर्दीनें भरलें होतें. दोन रुबाबदार कोचमन विलायती चाबूक कडकडवीत पुढल्या बाजूला बसले होते. लिव्हरी घातलेले दोन सैस मार्गे उभे होते. आंतल्या बाजूस एक वृद्ध जोडपें बसलें होतें. त्यांच्याबरोबर संरक्षणाला सशस्त्र स्वारांची एक तुकडी होती. शिग्राम थांबल्याबरोबर सैसांनीं उड्या मारल्या. एकानें घोड्याचे लगाम धरले व दुसऱ्यानें शिग्रामाचें दार उघडलें; त्याबरोबर एक कळीची पायरी दाराच्या खालीं आपोआप उघडली. तीवरून सावकाश, गणित

करून पाय टाकीत शिग्रामांतील वृद्ध गृहस्थ उतरला. त्याचे पाठोपाठ त्याची वृद्ध बायकोहि कमरेवर व गुडघ्यावर हात ठेवून त्याच पद्धतीनें उतरली.

अशा तऱ्हेचे लवाजमे त्या बाजूला क्वचितच येत. एखादा राजारजवाडा नर्मदा प्रदक्षिणेला किंवा एखादा सरकारी अम्मलदार स्वारीवर निघाला तरच असा योग येई. कोणी तरी मोठा मनुष्य आपल्या दारापाशीं आला आहे असें पाहून रमण डोकीला पागोटें घालून शिग्रामाच्या दाराजवळ येऊन उभा राहिला.

त्या वृद्ध गृहस्थाच्या अंगांत काळ्या अल्पाकाचा उंची कोट होता. त्याला मिन्याच्या रंगानें काढलेल्या स्वस्तिकांचीं सोन्याचीं बटणें लावलीं होतीं. त्याचे गळ्यांत रत्नजडित कंठा होता. तो त्यानें कोटाचे वर काढला होता. त्याचे बोटांत हिऱ्यांच्या अंगठ्या होत्या. त्याचप्रमाणें त्याच्या शर्टच्या हातांचीं व गळ्याचीं बटणें हिऱ्यांचीं होतीं. त्यानें जरा हालचाल केली कीं ते हिरे चमकत.

त्याची मुद्रा भव्य होती. त्याचें नाक उंच व सरळ होतें. डोळे मोठे व भेदक होते. परंतु त्यांचेखालीं काळीं वर्तुळें उमटलीं होतीं. त्यामुळें त्या गृहस्थाची पचनक्रिया बिघडली असून त्याच्या ढासळलेल्या शरीरप्रकृतीची ती निदर्शक झाली आहे, असें पाहणाराचें अनुमान निघे. रक्ताशयाचे दाबानें त्याचें तोंड फुगीर व लाल दिसत होतें. एवंच श्रीमंतीचे शाप त्याला पुरेपूर लागल्यासारखे दिसत होते. तो खालीं उतरल्याबरोबर रमणनें त्याला विनयपूर्वक अभिवादन केलें. त्यानें पण उपरोधिक हास्य करून उलट रमणला नमस्कार केला व त्याला मिठी मारली.

" रमण, तूं मला ओळखलें नाहींस ? बाकी तूं कसा ओळखणार ? अमरेळी सोडून मला किती वर्षे झालीं ! जवळ जवळ मी फरारीच झालों होतों ! " असें म्हणून तो मोठ्यानें हंसूं लागला. त्या वेळीं त्याच्या खोट्या दांतांची कवळी स्पष्ट दिसली.

" कोण, चमणलाल ? मी स्वप्नांत तर नाहीं ना ! " रमणचें आश्चर्य परमावधीला पोंचलें.

" अंऽहं, मी आतां नुसता चमनलाल नाहीं. सर चमनलाल झालों आहें; पण तुझा मात्र चमन्याच. "

" हा किताब काय छे ?" रमणनें विचारलें.

" अरे विलायतच्या कंपनीबहादूर राणीसरकारनें मला हा किताब दिला आहे. रमण, मी फार मोठा माणूस झालों आहें. पण मी मोठा दुसऱ्यांना, तुझ्या आणि माझ्या बाळपणच्या नात्यांत कधीं फरक व्हावयाचा नाहीं."

" असं कसं, सर चमनलाल. ईश्वरकृपेनें तुम्ही फार मोठ्या पदवीला पोहोंचलां आहांत. मला माझी पायरी सोडून कसें चालेल ?" पुन्हां अभिवादन करण्याकरितां रमणनें हात वर केले ते सर चमननें अर्ध्या वाटेंत धरले.

" रमण, तूं असा कृत्रिमपणा पाळशील तर मी इथं थांबणार नाहीं. मी कितीहि मोठा झालों तरी मला माझं बाळपण विसरतां येईल काय ? आपण पंतोजीच्या शाळेंत होतों. मी एका गरीब विधवेचा मुलगा. दर पौर्णिमेला पंतोजीची शिवराय दक्षणा देतांना मला पंचाईत पडे. परंतु तुझे उदार मनाचे वडील शाळेच्या कोपऱ्यावर गुरुदक्षिणा, नारळ व विड्याचीं पानें घेऊन दर पौर्णिमेला माझी वाट पाहत उभे राहत. तुला आठवतें, दुध्या पेन्सिली नवीन निघाल्या होत्या त्या ? मला दगडी पेन्सिल मिळण्याची मारामार, मग दुधी कुठली मिळणार ! पण तूं दर खेपेला जेव्हां दुधी पेन्सिल विकत घेईस तेव्हां अर्धी मोडून मोठा तुकडा मला देईस. एवढेंच काय पण माझ्या डोक्यांत खवडे पडले ते तुझ्या आईबापांनीं बरे केले. त्यांचे वण अजून माझे डोक्यांत दिसतात." असें म्हणून सर चमननें आपलें पागोटें काढून रमणला आपलें डोकें दाखविलें. मग पुढें चमनलाल बोलला,

" रमण, तुमचे उपकार पैशानें फिटतील ही कल्पना देखील मला सहन होत नाहीं. सांग, तुमचे उपकार कसे फेडूं ?"

" चमन, तुला श्रीमंती आली तरी तुझ्या गरीब मित्राला तूं विसरला नाहींस. माझ्या झोपडीला तुझी पायधूळ झाडलीस हें मी माझें भाग्य समजतों." रमणला वाटलें, आपण चमनवर काय उपकार केले ? ते उपकार फेडण्याचें काय कारण ? चमन उपकार फेडण्याच्या आपल्या श्रीमंतीच्या तोऱ्यांतील बाता मारीत आहे, असा रमणचा ग्रह झाला.

" बाबा, तुझी गरिबाची झोपडी मला राजवाडा वाटतो. तुझी झोपडी तूं लखलाभ करून घे. नको ती श्रीमंती. श्रीमंतींत सुख नाहीं. अगदीं खरा मनांतला अनुभव सांगतों मी." सर चमन बोलले.

तें ऐकून रमणचा चेहरा जरा विचारी झाला. आतां मात्र रमणची खात्री झाली कीं उपकार फेडण्याच्या चमन नुसत्या बाताच मारीत आहे. वास्तविक रमणला श्रीमंती काय आहे हें माहीत नव्हतें. त्याचप्रमाणें गरिबी त्याज्य असते हें देखील त्याला अपरिचित होतें.

" रमण, बोलण्याचे नादांत या डोकरीची आणि तुझी ओळख करून देण्याचें विसरलों. माझी सुख दुःख आणि कंपनीची पार्टनर लेडी चंपावती. मला तूं सर नाहीं म्हटलेंस तरी चालेल. पण यांना लेडी चमनलाल म्हटलें नाहींस तर चालणार नाहीं. डोकरीचा राग फार वाईट आहे हो."

" भाई रमण," लेडी चंपावती लाघवानें बोलूं लागल्या, " सर चमनना रात्रंदिवस थट्टामस्करी लागते. विलायतहून ते हेंच शिकून आले आहेत. म्हातारपणीं शोभते कां ही असली थट्टा ? "

" चल, चल घरांत. घाचणी सारखी भांडूं नकोस." सर चमनलालनें चंपावतीला घरांत नेलें.

त्या विनोदानें सर्वजण खूप हंसले. लेडी चमन घरांत मणीभाई उभ्या होत्या तिकडे गेल्या. त्यांना मणीबाईनीं व मृदुलेनें नमस्कार केला. लेडी चमननें मृदुलेचे दोन्ही हात पकडले व ती म्हणाली,

" सून कां लेक ? "

" सूनबाई आहेत माझ्या. "

" शतायुषी अष्टपुत्रा सौभाग्यवती हो. " असा आशीर्वाद देऊन लेडी चमननें मृदुलेला उजेडांत ओढीत नेलें व तिनें तिच्या हनुवटीला हात लावून तिचें तोंड फिरवून फिरवून पाहिलें. मग ती म्हणाली,

" याला म्हणतात खरं लावण्य. बाई, तुला पाहून राजकन्या देखील लाजेनें उशांतून तोंडें खुपसून बसतील."

लेडी चमनच्या डोळ्यांत अश्रू उभे राहिले. तिनें एक दीर्घ निःश्वास टाकला. साशंक रीतीनें पाहणाऱ्या मणीबाईला कळेना कीं हे आनंदाश्रु कीं दुःखाश्रु !

" सर चमन, इकडे या पाहूं. ही पाहा रमणभाईची सून. जशी कांहीं रतीच." मन आवरून लेडी चंपावती बोलल्या.

" अग, तूंच तुझ्या रतीला घेऊन बाहेर ये. पाहूं रमणभाईच्या मदनवरांपेक्षां तुझी रति सुंदर आहे कां ? "

आपल्याच अंगकांतीसारख्या केशरी साडीची लाज काढलेल्या मृदुलेची करांगुलि धरून तिला ओढीत लेडी चमन बाहेर आल्या व विस्फारित नेत्रांनीं त्या हेमचंद्राकडे पाहत राहिल्या. सर चमन व लेडी चमन यांची दृष्टादृष्ट झाली व दोघांनीं एकाच वेळेला निःश्वास टाकले.

" बाळा हेम, वडील माणसांना नमस्कार करावा." वडिलांचे आज्ञे-प्रमाणें मृदुलेनें व हेमचंद्रानें सर्वांना नमस्कार केला.

" खरंच, उषा-अनुरुद्धाचा जोडा आहे. " आंवढे गिळीत लेडी चमन बोलल्या.

सर चमनचे मनावर पूर्ण ताबा होता. त्यांचे तोंडावर कांहीं फरक पडलेला दिसला नाहीं.

सर चमनचें स्नान झाल्यावर ते दुकानचे गादीवर रमणबरोबर गप्पागोष्टी करीत बसले. दुकानांत गिऱ्हाईक आलें कीं चमनलाल त्याला गमतीनें माल तोलून देत.

" रमणभाई, माझी दुर्दशा काय होती तुला माहीत आहेच. मला ते दिवस विसरून जावेंसें वाटतें. "

" मग तुमचं भाग्य कसं उघडलं ? "

" पुरुषस्य भाग्यम्, पुरुषस्य भाग्यम्! बाबा, ब्राह्मणाला दान नि गृहस्थाला अवदान मिळाल्याशिवाय संपत्ति नाहीं. "

" छेः, छेः ! चमन तूं आपल्या अक्कलहुशारीवर, साहसावर सगळं मिळवलं असशील. मीं साहस केलं नाहीं म्हणून असा मागं पडलों. "

" रमण, तूं वेडा आहेस. अरे पुरुषाचं भाग्य असं आहे कीं तें क्षणांत माझी संपत्ति हरण करील व तूं निष्कांचन असलास तरी तुला माझ्या सारखा श्रीमंत करून सोडील. मी दहा वर्षांचा होतों तेव्हां घोल-क्याला माझी आई केवळराम नांवाच्या आमच्या नातेवाईकाकडे मला घेऊन गेली. ती आजारी पडली नि मग पुढें मेली. मग मी केवळराम-कडेच आचारी म्हणून राहिलों. पुढें केवळरामला आफ्रिकेला दुकान काढण्याचा मौका आला. तो मला आफ्रिकेला घेऊन गेला. त्यानें मला पहिल्या प्रथम पैची भागी दिली. त्याचा माझेवर लोभ जडला व तो निपुत्रिक असल्यामुळें मला आपला मुलगा समजूं लागला. वाढवीत वाढवीत

त्यानें मला आठ आण्यांची भागी दिली व पुढें मला सर्व दुकान देऊन आपण मेला. त्यानें मला आपल्यासारखें श्रीमंत केलें पण त्याचबरोबर निपुत्रिकहि केलें. ''

" काय, आपल्याला मूल बाळ नाहीं ? "

" छेः, त्याचे संपत्तीचा तो शाप आहे. आफ्रिकेहून मी इजिप्तला गेलों. इंग्रजी व फ्रेंच शिकलों. रुईचे धंद्यांत वाकबगार झालों. मी रुईचे सट्टे करूं लागलों. मीं हातांत माती घेतली कीं, सोनें होऊं लागलें. सर्व बाजूंनीं पैसा वाहत येऊन माझे तिजोरींत पडूं लागला. मग मी अहमदाबादेंत येऊन कापडाचा धंदा काढला. "

" किती हातमाग काढलेत ? "

" अरे वेड्या, हातमाग नाहींत. माझ्या तीन गिरण्या आहेत अहमदाबादेंत. पांच हजार माणसें काम करतात त्यांत. "

"काय, पांच हजार? आमच्या शिवसंगमची वस्ती सारी तीनशें आहे."

"मी पन्नास कंपन्यांचा डिरेक्टर आहें. माझ्या मालकीच्या बँका आहेत."

" वः, ठीक ठीक. किती लाखांची आसामी झाली ? "

" लाखांची ! किती कोटींची विचार. हा माझ्या अंगठीवरला हिराच दीड लाख किंमतीचा आहे. रत्नागिरीला ब्रह्मदेशाच्या थीबा राजापासून मीं तो विकत घेतला. याचें नांव पियुशुन् पीवूथान म्हणजे ब्रह्मदेशाचा प्रकाश असें आहे. "

" माझे डोळे तर बुवा दिपून गेले तुमच्या संपत्तीनें. खरोखर पुरुषस्य भाग्यम् जगांत आहे खरें. "

रमणला वाटलें कीं, चमनचा यांत काय पुरुषार्थ; आपल्या भाग्यानें कृपा केली असती तर आपण नसतों कां असे श्रीमंत झालों ?

"रमणभाई, मी अहमदाबादला आल्यावर तुझा खूप शोध केला पण तुझा पत्ता नाहीं. त्यांत मला सारखें युरोप, अमेरिका, जपानमध्यें जावें लागे. आज कलकत्ता, उद्यां मुंबई अशी माझी स्थिति झाली. आणि तुला खरें सांगतों, श्रीमंतीच्या व्यापांत मी तुला पार विसरून गेलों, स्वित्झरलंडांत बर्फाच्या उतरणीवरून बर्फाचा चेंडू फेंकण्याचा खेळ आहे. तो चेंडू बर्फावरून गडगडत खालीं जातांना बर्फाचे बारीक कण त्याला सारखे

ाचिकटून तो मोठा होत जातो. टेकडीच्या पायथ्याशीं जाईपर्यंत त्याचा एक अजस्र गोळा होतो. तद्वत् माझ्या धंद्याच्या व्यापाचें झालें आहे. ''

" चमनभाई, ती तुम्हांला सांपडणार कसा ? नर्मदेच्या पुलाचें काम सुरू झालें तेव्हां कमाई होईल म्हणून वडिलांनीं तेथें दुकान काढलें. तिथेंच आमची मोठी चोरी झाली व वडील वारले. मग मीं इथं दुकान काढलें. तेव्हांपासून आपली मीठ-भाकरी संभाळून इथंच राहिलों. माझं मन इथंच रमलं. ''

" खरंच ही रमणीय जागा आहे. ''

" मग राहा कीं महिना पंधरा दिवस. घर आपलंच आहे. ''

" माझी खूप इच्छा आहे. पण मँचेस्टरवाले चैन पडूं देतील तेव्हां ना ? त्यांच्याशीं टक्कर देऊन आम्हीं देशी धंदा काढला. आम्हीं कुचराई केली तर धंदा साफ बुडेल व देशाचें नुकसान होईल. मिशी खालीं होईल. उद्यां बडोद्यास व्हाइसरॉयसाहेबांची लेव्ही आहे. बडोदा नरेशांचें मला आमंत्रण आहे. त्यांच्या कानांवर गाऱ्हाणीं घालून आम्ही सवलती मिळवणार आहोंत. उद्यां सकाळला मला बडोदें गाठलेंच पाहिजे. नर्मदा-काठीं मला एक अन्नछत्र काढायचं आहे. म्हणून सुरगण्याच्या परग-ण्याला मीं विचारलें. त्याचा सल्ला घेतला. त्यानें मला तुझं नांव सांगितलं. मला संशय आला कीं आपला बाळपणचा मित्र आतां आपल्याला भेटणार. म्हणून मी वेळांत वेळ काढून तुझ्याकडे आलों. ''

इकडे स्वयंपाकघरांत लेडी चमननें मेवामिठाईनें, फळफळावळांनीं घर भरून टाकलें होतें. त्यांतील कित्येक पदार्थ त्या गरीब कुटुंबानें कधीं जन्मांत सुद्धां पाहिले नव्हते.

मृदुलेनें लेडी चमन सुद्धां जेवणाचीं पानें मांडलीं. मणीबाई शेजारीं बसून होत्या व मृदुला वाढीत होती. रमण व मणीबाई एक वेळ लेडी चमनच्या हातांतील हिऱ्याच्या बांगड्यांकडे पाहत व उजून मृदुलेच्या हातांकडे पाहत. दोघांचे विचार एक होते. मृदुलेच्या हातांत साध्या कांचेच्या काळ्या बांगड्या किती ठाकून बसतात व सुंदर दिसतात. मग अशा हिऱ्याच्या बांगड्या तिला किती तरी पट सुंदर दिसतील. अशा

तऱ्हेनें चोरून पाहतांना त्या नवराबायकोच्या नजरा मिळाल्या व तीं दोघें-जण मनांतल्या मनांत ओशाळीं झालीं.

संध्याकाळीं दिवेलागणीला सर चमननें निघण्याची तयारी केली. कारण त्यांना सकाळीं बडोदें गांठावयाचें होतें. मोतद्दारांनीं घोड्यांना पाणी पाजलें. स्वारांनीं बंदुकींत बार भरले. कारण रस्ता भिल्लांच्या प्रदेशांतून होता. सरसाहेब व त्यांच्या पत्नी शिग्रामांत जाऊन बसल्या व त्यांनीं मृदुलेला व हेमचंद्राला डोळे भरून पाहून घेतलें. त्यांनीं सर्वांना अहमदाबादेला पाहुणे या म्हणून आमंत्रण दिलें व सर्वांचा निरोप घेतला. चमनलाल रमणला म्हणाले कीं, " तूं मला तुला शोधण्याचा त्रास दिलास, त्याचा मी एक दिवस येऊन सूड घेईन. " रमणला चमनलाल काय बोलत होता तें कळलें नाहीं.

नंतर त्या वृद्ध जोडप्यानें अंगांत लोंकरीचे कपडे घातले, पायांवरून गरम कपडे घेतले, डोकीं शालींनीं गुंडाळलीं व बडोद्याचे बाजूला कूच केलें.

मणीबाईनें हेमचंद्र व मृदुला यांना घरांत नेलें व प्रथम त्यांची दृष्ट काढली. रमण बाहेरच रस्त्यावर अंधारांत नाहींशा होणाऱ्या शिग्रामाकडे पाहत उभा राहिला. शिग्रामाच्या कंदिलाच्या मागील बाजूच्या तांबड्या कांचा त्याला राक्षसाच्या लाल डोळ्यांप्रमाणें दिसत होत्या. त्यांच्याकडे पाहत असतांना त्याची तंद्री लागली. त्या वेळीं त्याला न कळत कैक विचार त्याचे डोक्यांत थैमान घालीत होते. सर चमनचे 'पुरुषस्य भाग्यम्', 'पुरुषस्य भाग्यम्' हे शब्द त्याचे कानांत सारखे घुमत होते. 'लहानपणीं शाळेंत असतांना चमनपेक्षां त्याचें अक्षर किती तरी वळणदार होतें, त्याचेपेक्षां तोंडचे हिशेब तो किती तरी जलद करी, त्याचेपेक्षां तो किती तरी पट हुशार होता. तो जर चमनसारखा धाडस करून आफ्रिकेला गेला असता तर त्याला सर चमनलाल सारखी किती तरी अक्कलहुशारी दाखवण्याची संधि मिळाली असती. तो चमनसारखाच कुबेर झाला असता. पण कर्मगति विचित्र. तो शिवसंगमीं नर्मदाशंकर होऊन बसला. याला म्हणतात दैवगति. चमनला तरी नशिबानेंच हात दिला. नशीब उघडण्याचें असलें तर इथें देखील तें उघडेल. आपण आतां म्हातारे झालों आहोंत. पण आपल्या लेकानें व सुनेनें गरिबींत कां राहावें ? छे:, पण मनुष्यानें वायफळ विचार करूं नयेत.

त्यांत सुख नसतें. संपत्ति दैवी आहे. मग आपलें दैव उघडेल काय ?' अशा विचारांच्या तंद्रींत कलरव करीत वाहणाऱ्या नर्मदेच्या नादांत गुंग होऊन तो स्वतःशींच बोलला,

" रमण, तूं वेडा आहेस."

" रमण, तूं वेडा नाहींस." त्या अंधाराच्या पैलतीरावरून त्याला कर्कश स्वरांत उत्तर आलें.

" वेड्या रमणभाई, तूं वेडा तर आहेसच, पण तूं मूर्खहि आहेस. दैव लाखांत एखाद्याचें उघडतें. तुला अशा उतारवयांत चमनसारखी संपत्ति मिळेल का ?" रमण स्वतःशींच बोलला.

" हो, अलबत् मिळेल. कां नाहीं मिळणार ? " अंधारांतून पुन्हां उत्तर आलें.

" तें कसं शक्य आहे ?" रमणनें विचारलें.

" पुरुषस्य भाग्यम् !" अंधारांतून उत्तर आलें.

रमणचें डोकें गरगरलें. त्याचेभोंवतीं अंधःकार गरगर फिरत होता. त्यानें डोळे फाड-फाडून पाहिलें. त्याला समोर कोणी दिसत नव्हतें. अंधार ग्रामोफोनच्या काळ्या तबकडीप्रमाणें गरगरा फिरत आहे व त्यांतूनच ते कर्कश आवाज निघत आहेत असें त्याला वाटलें.

" तें भाग्य मिळविण्याला काय करावें लागतें ?" रमणनें विचारलें.

" साधना. "

" साधना कशी सिद्धीला जाईल ?"

" साहसानें."

" साहस कुठें करावयाचें ?"

" दिव्यदृष्टि मिळव."

इतक्यांत समोरच्या वडाच्या झाडावरून एक हुमण मोठ्यानें ओरडली. रमण तंद्रींतून खडबडून जागा झाला. त्यानें पुनः डोळे फाडून पाहिलें. पण त्याला कोणी दिसेना. जिकडेतिकडे दाट अंधार पसरला होता. मोठ-मोठे पाण्याचे भोंवरे बिंगवीत नर्मदा नदी कलरव करीत नेहमींप्रमाणेंच वाहत होती. दोन्ही तीरांवर साधूंच्या धुन्या, स्मशानांतल्या चिता लांब अंतरावर जळतांना दिसत होत्या. त्यांचे पलीकडे जंगलांतून व डोंगरावरून

भिल्लांच्या मोहड्यांच्या, रेशाच्या व कोळशांच्या भट्ट्यांचा उजेड दिसत होता. जवळपास कोणी नव्हतें. मग त्याचेशीं बोललें कोण? रमण मोठ्यानें ओरडला,

"कोण आहे तिकडे?"

वडाखालून त्याला उत्तर मिळालें, "मी."

"तूं कोण? देव, यक्ष, किन्नर, पिशाच्च कीं मनुष्य?"

"यांपैकीं कोणी नाहीं."

रमण धीराचा होता. तो न डगमगतां बोलला,

"तूं कोणीहि ऐस, पण तूं माझ्यासमोर ये. नाहींतर तूं थांब. मीच तुझ्याकडे येतो."

"नको, मीच येतों." असें म्हणून एक व्यक्ति त्या वडाचे झाडाखालून आली व आपले हातांतील कातडी बॅग वर करून म्हणाली,

"नमस्ते।"

"तुम्ही देव, यक्ष, किन्नर, पिशाच्च किंवा मनुष्य नाहींत—मग आहांत तरी कोण?"

"पगलां, मी योगी आहें."

"योगीमहाराज——"

"माझें नांव हंसराज आहे."

"हंसराज महाराज, तुम्हांला प्रणाम असो. तुम्हाला माझें मन कसें छेडतां आलें?"

"बेटा, ही योगमाया आहे."

"मग मला दिव्यदृष्टि मिळेल? माझें भाग्य उदयाला येईल का?"

"अलबत्. माझा शब्द कालत्रयीं खोटा होणार नाहीं. तुझें भाग्य तुझे घरापासून पश्चिमेला एका हांकेवर आहे."

"पश्चिमेला तर विठ्ठलराव देवाजीच्या सैन्यांतील मराठे सरदाराचा वाडा आहे व त्यापलीकडे त्याची गढी आहे."

"त्याच वाड्यांत तुझं भाग्य आहे."

"त्या वाड्यांत विठ्ठलराव देवाजीनें काठेवाड उंटावर लुटून आणली तें सारं द्रव्य पुरून ठेवलं आहे."

" मला माहीत आहे. मला तें येथून दिसत आहे. मोठमोठ्या हंड्यांतून, कढयांतून सोनें, रूपें, हिरे, माणिकें, रत्नपाचू भरून ठेवले आहेत. मोहरांची तर गणति नाहीं. हें सारें द्रव्य तुझें आहे."

" त्यांत हिऱ्याच्या बांगड्या, रत्नांचे कंठे आहेत?" अधीर होऊन रमणनें विचारलें.

" वाटेल तितके."

" पण सरदार समंध होऊन राहिला आहे. रात्रीं तो वाड्यावरून गढीवर व गढीवरून वाड्यावर उड्या मारतो. मला तें द्रव्य नको. सरदाराचा निर्वंश झाला आहे."

" संतति व संपत्ति दैवानुसार आहे. मी समंधाचा बंदोबस्त करीन. त्याची तुला काळजी नको. पण तूं एक वेळ तें द्रव्य पाहा तर खरें."

रमणला वाटलें कीं आपली पुण्याई फळाला आली म्हणून हा कोणी देव तर आपल्यावर प्रसन्न होऊन इथें आला नाहीं ना?

" महाराज, आपण माझे घरीं चरणधूलि झाडावी." रमणनें योग्याला आमंत्रण दिलें.

तो हंसराजाला घेऊन दुकानांत आला. हंसराज खूप उंच, सडसडीत, सुंदर, गोरापान होता. केस विंचरून त्यानें भांग काढला होता. कौपिनीसारखा हुरमजी रंगाचा लांब रेशमी शर्ट त्यानें घातला होता. तो तलम धोतर नेसला होता व त्याचा शेवा त्यानें कमरेभोंवतीं आवळून त्याची गांठ पुढल्या निऱ्यांवर आणली होती. त्याचे पायांत चकाकणारा स्लीपर होता. त्याचे डोळे मोठे होते व ते सर्व बाजूंला शोधक रीतीनें गरगरा फिरत होते. गोड्या तेलाच्या उजेडांत देखील ते चमकत होते. जणूं काय ते एखाद्याच्या मनाची मोट बांधून त्याचें वशीकरण करीत होते. पण त्या नजरेंत अचाट शक्ति होती खास. योग्याचा दृष्टिक्षेप पोलादाच्या तटबंदीला देखील फोडून आरपार गेला असता. रमण संशयित नजरेनें त्याचेकडे पाहत राहिला.

" बेटा, तुझ्या मनांत काय चाललें आहे तें मी जाणतों. पण हा माझा राजयोग आहे. कमलपत्राला पाणी जसें चिकटत नाहीं तसे हे भोग आम्हांला स्पर्श करीत नाहींत."

रमणनें पुष्कळ योगी पाहिले होते. पण हा योगी त्या जातीचा खास नव्हता. पण त्याला 'हा खरा योगी आहे' असें वाटलें. त्याला योग्याच्या नजरेला नजर देववत नव्हती. तसले अधिकारी डोळे त्यानें कधीं पाहिले नव्हते.

"पाप्या, तुला खरं नाहीं वाटत ?" योग्यानें नारसिंहरूप धारण केलें. "योग्याच्या चित्शक्तीला विश्वांत तुलना नाहीं. आटवून टाकूं ही नर्मदा नदी ? उलथूं हा डोंगर ?"

हंसराजाच्या डोळ्यांत त्याचें सर्व सामर्थ्य, सर्व तेज एकवटलें. मणीबाई व मृदुला दाराआड उभ्या होत्या त्या कांपूं लागल्या. हेमचंद्रहि घाबरला. रमण "महाराज, क्षमा क्षमा," अशी भीक मागूं लागला.

मणीबाईनें योग्याचे पाय धरले. ती म्हणाली,

"महाराज, शांत व्हा. चूक पदरांत घ्या. मला चुडेदान द्या."

हंसराजाची नजर निवळली व त्यानें एक मोहक हास्य केलें.

"पतिव्रते माई, तुला तुझें इच्छित मिळेल. बोल काय पाहिजे तुला ?"

सर्व भीतीनें घाबरले होते. कोणी कांहींच बोलेना. योग्यानें पुटपुटत हातवारे केले.

"कोणतें अत्तर पाहिजे तुम्हाला ? खस ? हिना ? गुलाब ? कस्तुरी ? माती ? मोगरा ? वाळा ? बोला."

जिकडे तिकडे निरनिराळ्या अत्तरांचे सुवास सुटले व त्यांचा घमघमाट पसरला. जणूं त्या अत्तरांचीं कारंजीं उडत आहेत असे सुवास दरवळले.

योग्यानें पुनः हातवारे केले.

"कोणतीं फुलें पाहिजेत ?"

जिकडेतिकडे शेवंती, गुलाब, मदनबाण, जाईजुई, चंपक यांच्या राशी पडल्या.

"आणखी चमत्कार पाहिजे ?"

योग्यानें कलाकंद, बर्फी, पेढे, हालवे यांचे पुडे काढले. योग्यानें त्यांना ते पदार्थ खाण्याचा आग्रह केला. पण जेव्हां कोणीच त्यांतील कांहीं खाईनात, तेव्हां ते पदार्थ त्यानें जसे काढले तसेच नाहींसे केले, तेव्हां सर्व-जण आश्चर्यानें स्तंभित होऊन गेले.

" नास्तिकांनो ! आणखी चमत्कार, आणखी प्रचीति तुम्हांला पाहावयाची आहे ?"

" नाहीं, महाराज, अनुग्रह करा. "

" तोच करण्याकरतां मी येथें आलों आहें. अंगणांत धुनि लाव. "

रमणनें अंगणांत धुनि पेटवली. योगी हंसराज रात्रभर धुनीशेजारीं ध्रुवाचे ताऱ्यावर त्राटक करून बसला. त्याची इतकी एकाग्रता झाली होती कीं त्याचें शरीर काय, पण पापणी देखील हलत नव्हती. रमण त्याचेशेजारीं जागत बसला. सर्व रात्रभर योग्याचे डोळे उघडे होते.

दुसरे दिवशीं सबंध दिवसभर योग्यानें झोप घेतली नाहीं. तो सर्व दिवसभर मंत्रतंत्रांत गुंतला होता. कोणी असामान्य सामर्थ्याचा योगी रमणच्या अंगणांत बसला आहे, ही बातमी लोकांना लागली. त्यामुळें गांवचे गांव योग्याला पाहण्याला लोटले. हंसराज प्रत्येकाच्या मनांतील गोष्ट अचूक सांगी. त्यानें लोकांना आणखी चमत्कार करून दाखविले. लोकांची श्रद्धा अनावर वाढली.

दुसरे रात्रीं देखील रमण हंसराजाजवळ जागत बसला. पण त्यानें पापणीला पापणी लावली नाहीं. आधल्या रात्रींप्रमाणें तो ध्रुवावर त्राटक करून बसला. अशा तऱ्हेनें आठ दिवस व आठ रात्री गेल्या, पण हंसराज कधीं झोंपतांना आढळला नाहीं. रमणला झोंपेनें खाल्लें. तेव्हां त्यानें नाद सोडला.

दुसरे दिवशीं हंसराज त्याला हंसून बोलला,

" बेटा, योगी कधीं झोंपत नाहीं. "

त्या दिवशीं सकाळीं तो हेमचंद्राला घेऊन नदीवर गेला.

" हेमचंद्रा, पराक्रमाशिवाय पुरुष फुकट आहे. तूं पराक्रम कर. "

" महाराज, मी काय करूं ? "

" तूं भाग्य काढ. 'पुरुषस्य भाग्यम्' म्हणतात. पण पुरुषानें पराक्रम केल्याशिवाय त्याला भाग्य मिळत नाहीं. तूं आफ्रिकेला जा. तेथें तुझ्या नशिबांत पैसा आहे. "

" महाराज, आफ्रिका कोठें आहे ? "

" आफ्रिका समुद्राच्या पलीकडे हजारों मैलांवर आहे."

" महाराज, माझे वृद्ध मातापितरांना व तरुण पत्नीला मला तेथें कसें नेतां येईल ? "

" तूं एकटाच जा. चमनलाल नव्हता गेला ? तूं एकटा गेलास तरच तुझा कार्यभाग होणार आहे. "

" मग माझ्या वृद्ध मातापितरांची सेवा कोण करील ? माझी मृदुला हळव्या मनाची आहे. ती मी नसलों तर प्राण टाकील. "

" आफ्रिकेला सोन्याच्या, हिऱ्याच्या खाणी आहेत. त्यांचा तुला मालक करून टाकतों. माझें भविष्य कधीं खोटें होत नाहीं. "

" माझ्या मातापित्यांचे चरण सोडून मला कुठेंहि सुख लागणार नाहीं. माझेशेजारीं सुखानें झोपलेली मृदुला मला कुबेराच्या अलकावती-पेक्षां गोड वाटते. "

" पाहा, पाहा, विचार कर. आफ्रिकेंत माझे शिष्य आहेत. ते तुझ्या व्यापाराचा जम ताबडतोब बसवून देतील. अरे वेड्या, पैसा असला कीं, अशा शेंकडों अलकावती तुला मिळतील. शिवाय तुझा मानमरातब वाढेल. दुसऱ्यावर हुकूमत गाजवण्यासारखें सुख कशांत नाहीं. "

" महाराज, तुम्ही माझी परीक्षा पाहत आहांत. ज्या साहसांत सुख-शांति नाहीं तें कशाला करावयाचें ? हा नुसता अहंकार आहे. "

हंसराजनें आपलें संभाषण आटोपतें घेतलें.

त्या दिवशीं संध्याकाळीं अर्ध्या गुडघ्याएवढ्या नर्मदेच्या प्रवाहांत उभी राहून मृदुला धुतलेल्या साडींचे पिळे पिळत होती. तिनें आपली नेसती साडी पाण्यांत भिजूं नये म्हणून वर उचलून घेतली होती. त्यामुळें तिचे गोरे पाय उघडे पडले होते व त्यांनीं नर्मदेचा प्रवाह द्विधा झाला होता. स्वच्छ पाण्याच्या तळाशीं तिचीं मेंदीनें रंगवलेलीं पायाचीं नखें तांबड्या शिंपांप्रमाणें दिसत होतीं. संध्याकाळच्या उन्हांत लाटांचे डोक्यावर माणकें चमकत होतीं. त्याचप्रमाणें तळच्या वाळूंत जबलपूरहून वाहत असलेले संगमरवराचे तुकडे रत्नांप्रमाणें विखुरले होते. हंसराज एकदम तेथें प्रकट झाला. वांकलेल्या मृदुलेनें आपली मान आणखी खालीं घातली. त्यामुळें योग्याच्या मोहमय हास्याचा तिच्यावर कांहीं एक परिणाम होण्याचा संभव राहिला नव्हता.

“ मृदुले, हेमचंद्र किती निष्ठुर आहे ! असल्या सुकुमार देहाला तो कसा कष्ट देतो ? ” हंसराज म्हणाले.

“ यांत कसले आहेत कष्ट ? मी त्यांचे चरणांची दासी. माझी काया माझी नसून माझे स्वामीची आहे.” वांकल्या वांकल्याच मृदुलेनें उत्तर केलें.

“ छेः छेः ! मनुष्यदेह एकदांच मिळतो. अरे, अरे, काय हें नशीब ! रेशमी वस्त्रें देखील या देहाला खुपावींत ! पण इथें तर गोणपाटांची वेषभूषा ! जेथें हिऱ्यामोत्यांचे दागिने फिके दिसतील तेथें फुटका मणी सुद्धां अंगावर नाहीं. मृदुले, चल माझेबरोबर. ”

“ कुठं ? ”

“ लांब, लांब. या दुष्ट हेमचंद्रापासून लांब. तुला झोंपायाला पराच्या गाद्या, बसावयाला चंदनाचीं आसनें, खावयाला मिष्टान्नें, नेसावयाला रेशमी वस्त्रें, ल्यावयाला हिऱ्यामोत्यांचें अलंकार देतों. चल, चल. माझें सर्व योगसामर्थ्य एकवटून मी तुला वैभवसुख मिळवून देतों. बघ, या नर्मदेच्या ओसाडींत सुकलेल्या फुलाप्रमाणें आयुष्य घालवूं नकोस.”

ओणवी वांकलेली मृदुला आतांपर्यंत आपल्या पाण्यांतील प्रतिबिंबाकडे पाहत होती. ती कमललक्ष्मीप्रमाणें सरळरेषेंत उभी राहिली. फक्त तिचे पायाखालीं एक उमललेलें पुंडरीकच नव्हतें. त्या भीरु बालेच्या हरिणीप्रमाणें असलेल्या काळ्या डोळ्यांत सर्व स्त्रीसामर्थ्य, ब्रह्मांडांत वावरणाऱ्या आदिमायेची शक्ति केंद्रित झाली होती. हंसराज योग्याला देखील तिच्या नजरेला नजर देववेना. ती आपलें बळ एकवटून म्हणाली,

“ महाराज, हा अधर्म आहे. ”

हंसराज शरमून तेथून निघून गेला.

मृदुलेच्या अंतःकरणाला इतका जोराचा धक्का बसला कीं, कांहीं वेळ ती विमनस्क स्थितींत नर्मदेच्या प्रवाहांत तशीच उभी राहिली. तिचे डोळ्यांतून ओघळलेले अश्रु तिच्या गालांवरून नर्मदेच्या प्रवाहांत पडत होते. अश्रु पाण्यांत पडला कीं कडेचे बारीक मासे कांहीं भक्ष्य पडलें आहे या आशेनें धांवत येत व अशा तऱ्हेनें फसल्यामुळें रागावून तिचे पायांला चावा घेऊन पळून जात. पण तिचें त्याकडे लक्ष नव्हतें. हळूहळू अंधार पडूं लागला. तेव्हां हेमचंद्र तिला उशीर कां झाला

म्हणून पाहण्याकरितां नदीवर आला. त्यानें पाहिलें कीं पाण्यांत उभी राहून मृदुला रडत आहे. त्यानें तिला हाताला धरून किनाऱ्यावर आणिलें व आपल्या उत्तरीयानें तिचे अश्रू पुसले. "मृदुल, कां रडतेस ? तुला कोण बोललें, तुला माहेरची आठवण झाली ?"

"छेः ! मला उगीच रडूं आलें. पण खरं सांगा, अलंकाराशिवाय मी सुंदर दिसणार नाहीं ? आपणांस आवडणार नाहीं ?"

"वेडी कुठली !" हेमचंद्रानें तिचे गालांवर एक हळूच चापट मारली.

अलंकार मिळाल्यासारखें मृदुलेच्या तोंडावर हास्य चमकलें. परंतु आपल्या स्त्रीला आपण अलंकार देऊं शकत नाहीं या विचारानें हेमचंद्राचें अंतःकरण व्यथित झालें. घरीं परततांना त्याचीं पावलें जड पडत होतीं.

या गोष्टीला सात आठ दिवस होऊन गेले. योग्याचे मंत्रतंत्र, किमयाप्रयोग वगैरे क्रियांची साधना चालू होतीच. या अवधींत त्याची आणखी खूप प्रसिद्धि झाली. आजूबाजूच्या खेड्यांवरून रमणच्या घरीं यात्रा लोटूं लागली. हंसराज लोकांना गंडेदोरे देई, नुसत्या दृष्टिनिक्षेपानें रोग बरे करी, प्रत्येकाचें मनोगत सांगी. सर्वांना योग्याच्या साधनेचा गुण येऊं लागला. सर्वांची त्याच्या अचाट सामर्थ्याबद्दल खात्री झाली व सर्वजण त्याचे पूर्ण भजनीं लागले. सर्वजण असा थोर साधु पुरुष आणल्याबद्दल रमणला धन्यवाद देऊं लागले. रमणला वाटलें आपलें खूप महत्त्व वाढलें.

रमणच्या डोक्यांत सर चमनलालचे 'पुरुषस्य भाग्यम्' हे शब्द सारखे घुमत. तो मृदुला व हेमचंद्र यांचेकडे पाहून सुस्कारे टाकी. मणीबाईचे लक्षांत ही गोष्ट आली. ती रमणकडे पाहून सुस्कारे टाकी. हेमचंद्र मृदुलेकडे पाहून खिन्न होई व मृदुला आपल्या घरचे मंडळींचे मनोवृत्तींत झालेला फरक लक्षांत येऊन घाबरून जाई.

अखेर मणीबाई एके दिवशीं आपल्या नवऱ्याला म्हणाली,

"विचारा ना योगीराजांना. त्यांचें सामर्थ्य इतकें आहे तर देतील एखादी सिद्धि."

"ते म्हणतात, साधना केली पाहिजे."

"मग करूं आपण. त्यांत काय आहे एवढें ?"

त्या दिवशीं दुपारीं एकांत पाहून रमणनें व मणीबाईनीं हंसराजांची भेट घेतली.

" महाराज, चमनलालसारखं माझं भाग्य उदयाला येईल काय ?"

" आंता कसा रस्त्यावर आलास ? मी तुम्हांला भाग्याचा रस्ता दाखवतों. पण सर्व तुमच्या इच्छाशक्तीवर अवलंबून राहील. चला माझ्या मागोमाग."

रमण व मणीबाई योग्याचे मागोमाग निघाल्या. योग्यानें त्यांना सरदाराच्या वाड्यासमोर आणून उभें केलें. वाडयाचे कुंसावर कैक वर्षांचा जाईचा जुनाट वेल साप चढल्यासारखा दिसत होता, इतका तो जाड झाला होता. रमण व मणीबाई तो वेल पाहून दचकले, पण योग्यानें त्यांना तो वेल असल्याचें सांगितलें. वाडयाला टाळें लावलें होतें. वाडयाच्या तिन्ही तालांवर गढीची सावली पडली होती. म्हणून वाडा भेसूर दिसत होता. वाडयाच्या आख्याइकांमुळें तिकडे कोणी फिरकत नसे.

योग्यानें युक्तीनें मागील एक दार उघडलें व ते तिघेजण आंत शिरले. सरदाराची जंगम मिळकत निरनिराळ्या खोल्यांतून सांठवून ठेवली होती व खोल्यांना कुलपें लावलीं होतीं. दारांच्या फटींतून पाहिलें म्हणजे उन्हाच्या तिरपेंत खोल्यांतून भरून ठेवलेलें सामान दिसे. कांहीं खोल्यांतून एक हजार माणसांच्या समाराधनेला पुरतील इतकीं भांडींकुंडीं, पेले, गडवे, ताटें, वाट्या भरून ठेवल्या होत्या. एक खोली नुसत्या पाटांनींच भरली होती. एका खोलींत रेशमी कपडयांच्या पेट्या होत्या. एका खोलींत मुलांचीं खेळणीं भरलेलीं होतीं. त्यांचे शेजारच्या खोलींत गौरीसमोर मांडण्याचीं लाकडाचीं व मातीचीं चित्रें, मुलांचे खेळ, गौरीसमोर मांडण्याच्या इतर कलाकुसरीच्या जिनसा, पोतकामें, जिगकामें, कलाकौशल्याचे नमुने, रंगीत पडदे, लांकडी देव्हारे अशा जिनसा भरून ठेवल्या होत्या. त्या खोल्यांचे पलीकडे गौर मांडण्याचा एक अवाढव्य दिवाणखाना होता.

दुसऱ्या मजल्यावर सरदाराचें शयनगृह होतें. त्यांत चंदनाचा पलंग होता. त्यावर चंदनाचे लांकडाला पांढरें कापड लावलेला एक पंखा टांगला होता. पंखा ओढण्याकरतां पांढऱ्या सुतळीचीं दोरखंडें लावलीं होतीं. त्यांना अर्ध्यावर गांठी मारल्यामुळें तीं तशींच लोंबकळत होतीं. पलंगावर एक मोठा गदेला पसरला होता व त्यावर पलंगपोस अंथरला होता. त्यावर

एकहि सुरकती नव्हती. कैक दिवसांची धूळ खाल्ल्यामुळें तो थोडासा मळकट दिसत होता. एवंच सरदार मेला त्या वेळीं जशी पलंगाची स्थिति होती, तशीच ती आतांपर्यंत राहिली होती. तो देखावा पाहून सरदाराचें भूत रोज रात्रीं पलंगावर निजत असावें व कोणी तरी पंखा ओढून त्याला वारा घालीत असावें असें वाटत होतें. तो तीनताल वाडा हिंडून झाल्यावर ते तिघेजण तळमजल्यावरील देवघरांत आले.

" सरदाराचं द्रव्य इथं पुरून ठेवलं आहे. चमनलाल देखील तुझा हेवा करील इतकं तें द्रव्य आहे. तें वाहून नेतांना तुला कितीतरी दिवस लागतील " असें म्हणून योग्यानें भिंतीवर एक लाथ मारली. त्याबरोबर खण्ण असा एक आवाज झाला.

" या भिंतींत मोहरांचा हंडा पुरला आहे. या प्रत्येक कोनाड्यांत मोहरांचीं तपेलीं पुरलीं आहेत. त्यामुळें भिंतींना पोटें आलीं आहेत. हे पाहिलेस का साखळदंड, जमिनीपासून आणून भिंतींत गाडले आहेत ते ? जमिनींत पुरून ठेवलेलें द्रव्य भूगर्भातील हालचालींनीं सरकून दुसरीकडे जातें व मग सांपडत नाहीं. म्हणून हे साखळदंड द्रव्याच्या पुरलेल्या हांड्यांना बांधले आहेत. हें द्रव्य तुमच्या नशिबांत आहे. बोला तुमची इच्छा. "

रमण व मणीबाई चिंतातूर झाले. अभिलाष त्यांना 'द्रव्य घ्या' म्हणून सांगत होता. त्यांच्या अपहाराच्या सर्व वासना जाग्या झाल्या होत्या. पण त्याच वेळीं चमनलालाचे शब्द त्यांना आठवत होते. तो म्हणाला होता, "केवळराम निपुत्रिक होता. त्याची संपत्ति शापित होती. म्हणून तो निपुत्रिक राहिला होता. श्रीमंतींत सुख नाहीं. " रमण व मणीबाई-समोर हेमचंद्र व मृदुला यांचीं मनोमय रूपें उभीं राहिलीं व त्यांचीं अंतःकरणें चर्र झालीं. सरदार निर्वंश मेला व समंध होऊन राहिला आहे. तेव्हां आतां काय ठरवावें असा प्रश्न त्यांचे मनांत काहूर करूं लागला.

" नको हें द्रव्य आम्हाला," दोघें नवराबायको एकदम म्हणालीं.

योगी हंसराज निर्भय रीतीनें हंसले व त्यांनीं खिशांतून एक डबी काढली व तींतील अंजन रमणच्या व मणीबाईच्या अंगठ्यांच्या नखांना लावलें.

" आंता या अंजनावर दृष्टि स्थिर करा व काय दिसतें तें मला सांगा."

" अबब ! किती हे मोहरांचे हंडे व रत्नांचे रांजण. पिवळ्या धमक मोहरांच्या व लखलखणाऱ्या रत्नांच्या राशी. चमनलालजवळ अशीं रत्नें खास नव्हतीं. " रमण बोलला.

" करवंदाएवढ्या मोत्यांचे करंडे, जडावांचे अलंकार मला दिसत आहेत. " मणीबाई बोलल्या.

"आतां काय दिसतें आहे!" आवाज घुमवून हंसराजनें रमणला विचारलें.

" मिन्याचें काम केलेले जडावाच्या पदकांचे हार, रत्नांचे कंठे, निरनिराळ्या रत्नांच्या अंगठ्या, रत्नजडित पौच्या, रत्नांचे शिरपेंच—"

" आणि आतां ? "

" आतां हेमचंद्र माझेसमोर उभा आहे. त्याचे गळ्यांत ते रत्नजडित हार व कंठे घातले आहेत. मनगटावर पौच्या बांधल्या आहेत. बोटांत रत्नजडित अंगठ्या घातल्या आहेत. मंदिलावर शिरपेच लावला आहे. माझा हेमचंद्र राजपुत्रासारखा सुंदर दिसत आहे. "

" चमनलालपेक्षां कशीं रत्नें आहेत हीं ? "

" हीं रत्नें मौल्यवान् आहेत. "

" तुझ्या हेमचंद्राला देणार हीं रत्नें कीं नाहींस ?"

" हो देणार. देणार खास. "

"आतां तुला काय दिसतें आहे ?" हंसराजानें मणीबाईला आवाजाला कंप देऊन विचारलें.

" हिरे, माणकें, पांचू यांचे अलंकार. हिऱ्यांच्या बांगड्या, रत्नजडित बाजुबंद, बिजवरे, मोत्यांच्या मोहनमाळा, रत्नजडित मोहरांच्या अंगठ्या."

" चंपावतीपेक्षां चांगल्या आहेत हिऱ्याच्या बांगड्या ?"

" होय."

" आतां काय दिसतें आहे."

" अहाहा ! माझी मृदुलाबाई, अशीच तूं माझेसमोर उभी राहा. माझी रत्नासारखी पोर राजकन्येसारखी, अप्सरेसारखी सुंदर दिसत आहे. बाई! तुझी मी दृष्ट काढीन. हिऱ्यांचे दागिने तिला किती सुंदर दिसत आहेत, मोत्यांनीं किती नाजुक दिसते आहे ती. "

" मृदुलेला नकोत हे दागिने ?"

" नकोत कसे ? हवेत हवेत."

मग हंसराजनें त्यांचे नखांला लावलेलें अंजन पुसलें. त्याबरोबर त्यांचे डोळ्यांसमोरील इंद्रजालाचा देखावा नाहींसा झाला व ते शुद्धीवर आले. त्यांचे डोळे एकाग्रतेनें तारवटलेले होते. त्यांचीं मनें ताळ्यावर आल्या-नंतर ते म्हणाले,

"या द्रव्यानें आमचे डोळे दिपले आहेत. आम्हां गरिबांच्या नशिबांत एवढें द्रव्य कसें असेल ? हें आम्हांला पचणार नाहीं. यांत धोका आहे."

" कांहीं धोका नाहीं. तुम्ही निश्चित राहा."

" समंधाची काय वाट ? तो कसा या निधीला हात लावूं देईल ? "

" त्याची तुम्हांला काळजी नको. मी त्याचा बंदोबस्त करीन. "

याप्रमाणें बोलणीं झाल्यावर ते तिघे घरीं आले. वाटेनें द्रव्याकरितां साधना करावी लागेल असें हंसराजनें त्या वृद्ध जोडप्याला पटवून दिलें व जोडप्यानें साधना करण्याचें कबूल केलें. हंसराजनें त्यांना कांहीं त्या दिवशीं साधनेची कल्पना दिली नाहीं.

दुसरे दिवसापासून हंसराज साधनेच्या तयारीला लागला. त्यानें प्रथम ग्रहांची शांति केली. नवग्रहांना निरनिराळ्या धातूंच्या पात्रांत निरनिराळीं फळें, फुलें, वस्त्रें व धान्यें घालून समर्पण केलीं. ते सर्व पदार्थ धातूंच्या पात्रांसुद्धां भस्म होऊन गेले. रमण, मणीबाई, हेमचंद्र व मृदुला आश्चर्यानें स्तंभित झालीं.

"वाः ! सुरुवात चांगलीच झाली. ग्रहांनीं दानांचा स्वीकार तर केला." हंसराज उद्गारला.

" आतां पुढें काय करावें लागेल ? " रमणनें विचारलें.

" द्रव्याचे खरे मालक हेमचंद्र व मृदुला. साधना करून त्यांचेभोंवतीं सिद्धकवच निर्माण करावयास पाहिजे. समंध कांहीं म्हाताऱ्या माणसांना त्रास देणार नाहीं. "

" त्या कवचाची साधना करावी मग. "

" होय. त्याकरितां त्यांना अग्निप्रवेश करावा लागेल. "

" काय म्हणतां ? अग्निप्रवेश ? " रमण व मणीबाई घाबरून एकदम ओरडलीं.

" होय, अग्निप्रवेश. घाबरलातसे? योगसामर्थ्यावर तुमचा विश्वास नाहीं? ध्यानांत ठेवा, संशयात्मा विनश्यति. आत्मा अमर आहे. न इमां दहति पावकः. उद्यां मी स्वतःवर तो प्रयोग करून दाखवीन. मग तर तुमची खात्री होईल!"

दुसऱ्या दिवशीं हंसराजनें एक मोठा चर खणला. त्यांत भिल्लांनीं लांकडें आणून टाकलीं. योगी विस्तवावर चालून दाखवण्याचा प्रयोग करणार आहे ही बातमी कळल्यामुळें गांवचे गांव रमणचे दारासमोर लोटलें. चरांतील लांकडें पेटविण्यांत आलीं. तीं जळून गेल्यावर जेव्हां झगझगीत निखारे उरले तेव्हां हंसराज चराचे या टोंकापासून त्या टोंकापर्यंत सावकाश चालत गेला. सर्व लोक 'हाः' म्हणून ओरडले. हंसराजाचे पायावर तिळायेवढा फोड देखील उठला नाहीं.

हंसराजनें रमणला त्याचा हात धरावयास सांगितलें. रमणनें धीरानें त्याचा हात धरला व तो त्याच्याबरोबर निखाऱ्यांवरून सुखरूप चालत गेला. याप्रमाणें हंसराजनें मणीबाई, हेमचंद्र व मृदुला यांना त्या खाईतून चालत नेलें. प्रेक्षकांतील जे धीट लोक पुढें आले त्या सर्वांना पण त्यानें त्या चमत्काराचा अनुभव घेऊं दिला. कोणालाहि यत्किंचित् इजा झाली नाहीं. योगाच्या सामर्थ्याबद्दल सर्वांचा विश्वास परमावधीला पोहोंचला.

" काय, झाली खात्री?" हंसराजनें रमण व मणीबाईना विचारलें.

त्या चमत्कृतिपूर्वक प्रयोगामुळें सर्वांचीच योगशक्तीच्या प्रभावाबद्दल खात्री झाली होती; कुणालाहि कसलीच शंका राहिली नव्हती. त्यामुळें सर्वजण हात जोडून हंसराजापुढें उभे राहिले.

" मणीबाई, गोरखनाथांनीं गोपीचंदाची काया अमर केली त्या वेळीं मैनावतीला त्यांचेबद्दल अशीच शंका आली होती. तेव्हां तूं शंका सोडून दे. साधुपुरुषाची प्रतीति पाहूं नये. जसे आतां माझा हात धरून तुम्ही विस्तवावरून चालत गेलांत तसेच उद्यां मी एक अग्निकुंड तयार करीन त्यांत माझा हात धरून हेमचंद्र व मृदुला यांनीं चालत जावयाचें. दोन तासांनीं त्यांची काया दिव्य होऊन त्यांना कवच प्राप्त होईल."

" महाराज," रमण बोलला, " माझीं मुलें तुमचींच आहेत. तुम्ही कराल तें मला प्रमाण आहे."

त्यानंतर आश्चर्यानें थक्क झालेले लोक आपापल्या घरीं निघून गेले.

त्या दिवशीं रात्रीं मृदुला हेमचंद्राला म्हणाली,

" आपणाला हें द्रव्य कशाला पाहिजे ? आपण या साहसाचे नादीं लागूं नये. "

" पण तुला अलंकार पाहिजेत ना ? "

" मीं कधीं मागितले ? "

" नदीवर रडत नव्हतीस त्यांचेकरितां ? "

" छेः, मुळींच नाहीं. त्या दिवशीं माझं हृदय भरून आलं होतं म्हणून मी रडलें. "

" लबाड कुठली ! बायका नेहमीं असंच तोंडानें नाहीं नाहीं म्हणतात. पण त्यांचे मनांतून मात्र नवऱ्यानें त्यांचें कोडकौतुक पुरवावें असें असतें. मग आतां कां भितेस ? तुला पाहिजे तर तूं नको येऊंस अग्निकुंडांत माझेबरोबर. "

" मी स्वतःकरितां भीत नाहीं. मला माझ्या प्राणांची बिलकुल भीति नाहीं. मला सर्वस्वीं आपली काळजी."

" दागिने पाहिजेत, मग साहस कां नको ? योगीमहाराजांनीं आतां-पर्यंत थोडे चमत्कार केले नाहींत. कांहींतरी चमत्कार करून ते आपले मनोरथ पुरवणार खास. धीर धर आणि काय चमत्कार होतील ते पहा. "

मृदुला बिचारी गप्प बसली. तिनें निश्चय केला कीं, आपला पति आपलें कितीहि सत्त्व पाहो, पण आपण माघार घेणार नाहीं.

दुसरे दिवशीं सकाळपासून हंसराजानें अग्निदिव्याची तयारी चालविली. ती बातमी हां हां म्हणतां सगळीकडे पसरली. गांवोगांवचे लोक ती गम्मत पाहावयास लोटले.

सरदाराचा वाडा व गढी यांचे मधोमध एक लहानसें पटांगण होतें. त्या जागेंत हंसराजानें भिल्ल लावून एक खड्डा खणवला. त्यांत बाभूळ, चंदन व विशेषाचीं लांकडें टाकलीं व त्यांचा एक मोठा ढीग केला. प्रेक्षक लोक देखील हौसेनें लांकडें वाहण्यास मदत करीत होते. ते अग्नि-कल्पाचा प्रयोग बघण्यास अगदीं आतुर झाले होते.

हंसराजाला त्याचे तीन शिष्य मदत करीत होते. जसा तो अंधारांतून शिवसंगमला आला होता तद्वतच ते पण तेथें उद्भवले होते. ते कोण होते, कुठून आले होते व त्यांचा व हंसराजांचा किती दिवसांचा व कशा प्रकारचा संबंध होता तें कोणालाहि कांहीं माहित नव्हतें. हंसराज त्यांना हुकूम देत होता व त्याप्रमाणें ते तंत्रमार्गाचीं चिन्हें व आकृत्या काढीत होते, स्थंडिलें बनवीत होते, जमिनीवर रेघा ओढीत होते, व गुलाल, बुक्कयाच्या रांगोळ्या काढीत होते. त्यांनीं मंत्र उच्चारीत आजूबाजूला नारळ फोडले व कैक लिंबें कापून फेंकलीं.

हंसराजानें अग्निकुंडाचे प्रवेशद्वाराजवळ केळीच्या खांबाचें एक मखर केलें व अग्निकुंडाचे बाजूनें प्रदक्षिणा करण्याकरितां एक वर्तुळाकार मार्ग ठेवला. त्यानें केळीच्या मखराजवळ दोन रांजण ठेवले. त्याचप्रमाणें त्या वर्तुळाकार मार्गावर ठराविक सारख्या अंतरावर छातीइतक्या उंचीचे रांजण मांडले. ते बाहेरून ओले व पाझरतांना दिसत होते. त्यावरून त्यांत पाणी भरलें आहे असें वाटत होतें. मग हंसराजनें एक पेटी फोडली व कापराच्या वड्या काढून सगळीकडे पसरून ठेवल्या. त्यानंतर त्यानें घंटा, तास, शंख, शिंगें, ढोल, डमरू, मृदंग अशीं वाद्यें सर्वांना वांटलीं व त्यानें सर्वांना तीं वाद्यें जोरजोरानें वाजविण्यास सांगितलें. त्या वाद्यांच्या गजरांत तो मृदुला व हेमचंद्र यांना नर्मदेवर घेऊन गेला. पुढें नदीवर स्नान करून तीं तिघे अग्निकुंडाकडे परतलीं.

हंसराजनें लालभडक रेशमाचीं वस्त्रें परिधान केलीं होतीं, गळ्यावर-खांद्यावर गुलाल उधळून घेतला होता व गळ्यांत जास्वंदीच्या फुलांच्या माळा घातल्या होत्या. हेमचंद्र पिवळा पितांबर नेसला होता. त्याचा शरीराचा वरचा भाग उघडा होता. त्याचे गळ्यांत मोगऱ्याच्या फुलांची माळ होती. त्याचे पुष्ट स्नायूंकडे व तेजस्वी अंगकांतीकडे लोक पाहतच राहिले मृदुला केशरी साडी नेसली होती. तिनें भांगांत शेंदूर भरला होता. तिचें गळ्यांत बकुळीचे फुलांची माळ होती.

तीं तिघे नदीवरून आलेलीं पाहिल्याबरोबर सर्वांनीं जोरानें वाद्यें वाजविण्यास सुरुवात केली. त्या गजरांत कोणाचा शब्द कोणाला ऐकूं येईना. अग्निकुंडाच्या द्वाराजवळ हंसराजनें अग्नीची पूजा केली व हेमचंद्र व मृदुला

यांना एक पेय पिण्यास दिलें. नंतर त्यानें कापराच्या वड्या पेटवून अग्नि प्रदीप्त केला. थोड्या वेळानें आगीचा डोंब उठला व त्याच्या ज्वाला वाड्याच्या तिन्ही तालांपेक्षां देखील वर जाऊं लागल्या. आतां त्या ज्वाला गढीच्याहिपेक्षां वर जातात कीं काय असें वाटूं लागलें. मग हंसराजनें मृदुला व हेमराज यांचे हात पकडले. त्यांना घेऊन पळत पळत तो त्या पेटलेल्या अग्नीभोंवतीं प्रदक्षिणा करूं लागला. रमण व मणीबाई "अग्नि-नारायणा शांत हो, शांत हो" असें हात जोडून म्हणत उभीं राहिलीं होतीं.

दुपारचे बरोबर बारा वाजले होते. सूर्य मध्यावर आला होता. पेट-लेल्या आगीचे धगीनें वातावरण तापून मृगजल तयार झालें व तापलेली विरळ हवा जाऊन गार गार हवा तेथें येऊं लागली. म्हणून वाऱ्याचा झोत सुरू झाला. लोक जोरजोरानें गजर करूं लागले. आतां काय चमत्कार होणार हें पाहण्याकरतां लोकांची उत्कंठा कमालीची वाढली. ते डोळे फाड-फाडून पाहूं लागले. अग्निकुंडाभोंवतीं लोकांचें गर्दीचें कडें पडलें होतें.

कडयांतील एका बाजूचे लोकांना कड्याचे दुसऱ्या बाजूचे लोक आगीचे डोंबांतून मृगजलांत व मृगजलांतून आगीचे डोंबांत पडतांना दिसत होते. त्याचप्रमाणें हेमचंद्र, मृदुला व हंसराज यांच्या मूर्ति प्रदक्षिणा कर-तांना, एकदां आगींत शिरतांना व एकदां त्यांतून बाहेर पडतांना दिसत होत्या. अर्थात् तो आगीमुळें उत्पन्न झालेल्या मृगजलाचा चमत्कार होता.

इतक्यांत लोकांना हेमचंद्र नाहींसा झालेला दिसला व केळीचे मखरांत हंसराज मृदुलेचा हात धरून तिला रांजणाकडे ओढून नेत आहे व मृदुला बळ करून आगीकडे चालली आहे असें दिसलें. तों आगीचा मोठा लोळ वाऱ्याचे झोतानें त्यांचे बाजूला गेला व धुराचा व तापलेल्या राखेचा भपकारा उठला, त्यांत क्षणभर तीं दोघें नाहींशीं झालेलीं दिसलें. त्यानंतर मृदुला, हंसराज किंवा हेमचंद्र यांपैकीं कोणी पुन्हां दिसलीं नाहींत. लोक अग्निनारायणाच्या नांवानें जयघोष करून जोरजोरानें वाद्यें वाजवूं लागले. आगीच्या ज्वाला धाडधाड करून वर जाऊं लागल्या. मणीबाई मूर्च्छा येऊन खालीं पडली. तिला सावध करण्याकरितां कांहीं लोक धांवले. ती शुद्धीवर येईना, तेव्हां लोकांनीं तिला उचलून घरीं नेलें. रमण मात्र हात जोडून अद्याप उभा होता. तो तोंडानें कांहीं पुटपुटून अग्निनारायणाला

शांत होण्याकरितां सारखे नमस्कार करीत होता. तो काय बोलत होता तें कोणासच ऐकूं येत नव्हते. आग मात्र धाडधाड करून सारखी वर जात होती.

कांहीं वेळानें वाद्यें वाजवून लोक दमले. परंतु अग्निकुंडांतून कोणी बाहेर आलें नाहीं. हंसराजनें दोन तासांचा अवधि दिला होता. तो सरून कितीतरी जास्त वेळ झाला. अग्नीच्या ज्वाला कमी होत चालल्या व अग्निकुंडांत जळत्या लांकडांशिवाय कांहीं नाहीं अशी खात्री होत चालली. पण रमणची खात्री होईना. तो म्हणे,

" छेः छे, योगीमहाराजांचें सामर्थ्य अचाट आहे. मीं त्याची प्रचीति पाहिली आहे. ते माझे बाळांना घेऊन आल्याशिवाय खास राहणार नाहींत."

गर्दीतील कांहीं लोक रमणला दोष देऊं लागले. ते म्हणाले,

" छेः, तीं तिघेंहि जळून खाक झालीं. गोसावड्याच्या नादीं लागून रमणनें आपला निर्वंश केला."

कांहींना अजून शंका होती.

" अहो, ते जळले असते तर किरमट घाण नसती कां आली ? "

त्यांना पहिले लोक उत्तर देत,

" अहो चंदन व कापूर सपाटून होता त्यांत. मग कशी तुम्हांला घाण येईल ? "

कांहीं म्हणत, " अहो, आम्हांला तीं तिघेजण ज्वालांवरून आकाशांत जातांना दिसलीं."

तो दिवस व त्या दिवसाची रात्र रमण अग्निकुंडांतील ज्वालांकडे टक लावून बसला. त्याला सारखें वाटत होतें कीं त्यांतून त्याचीं बाळें बाहेर पडतील. त्या अवधींत त्यानें अन्नपाण्याचा लेश घेतला नाहीं. कांहीं गांवकरी त्याला सोबत करीत बसले. दुसरे दिवशीं आग खूप दबली व आगीचे निखाऱ्यांत लोकांना अस्थि दिसल्या. लोकांनीं आग विझवून महत्प्रयासानें अस्थि गोळा केल्या. त्यांचे लांबीवरून लोकांनीं कयास बांधला कीं, हेमचंद्र व मृदुला त्या स्वाहाकारांत जळून गेलीं. हंसराज त्यांचेपेक्षां कितीतरी उंच होता. त्यामुळें सांपडलेल्या अस्थींतील हाडें त्याचीं नव्हतीं असें खास ठरलें.

आतां मात्र रमणची खात्री झाली कीं, मुलांचा घात झाला. त्यानें मोठ्यानें हंबरडा फोडला व तो आकांत करूं लागला. लोकांनीं त्याला जबर-

दस्तीनें उचलून घरीं नेले. घरीं मूर्छित मणिबाई अद्याप पूर्ण शुद्धीवर आली नव्हती. गांवकरणीबाया तिला उपचार करीत बसल्या होत्या. गैर-शुद्धींतच ती मृदुला व हेमचंद्र यांचे नांवानें टाहो फोडी, त्यामुळें सर्वांचीं अंत:करणें विदीर्ण होत.

लोकांनीं रमणला घरीं आणल्यावर दुकानाचे गादीवर बसवलें. तेथेंच तो वेड्यासारखा कांहीं हालचाल न करतां निश्चल रीतीनें बसून राहिला. पक्षाघात झाल्याप्रमाणें त्याचे अवयव लुळे झाले होते. संध्याकाळीं त्याचे समाचारास आलेल्या व त्याला सोबत करीत बसून राहिलेल्या लोकांत अग्नि-दिव्याबद्दल चर्चा सुरू झाली. त्याकडे त्याचें बिलकूल लक्ष नव्हतें. तो तारवटलेल्या डोळ्यांनीं नर्मदेच्या प्रवाहाकडे पाहत बसला.

कोणी म्हणाले योगी आयत्या वेळेला मंत्र विसरला म्हणून प्रयोग चुकला. कोणी म्हणाले तो योगी नसून कोणी लफंग्या जादूगार होत. त्याचा मृदुलेवर डोळा होता. म्हणून त्यानें त्या दोघांना पेयांत भांग पाजली व त्या गुंगींत त्यानें हेमचंद्राला आगींत लोटून देऊन मृदुलेला पळवून नेण्याचा डाव रचला. परंतु त्या साध्वीच्या आत्मबलिदानानें तो फसला. डाव फसल्यामुळें तो नजरबंदी करून एकटाच अग्निकुंडाच्या समोर मुद्दाम ठेवलेल्या एका रिकाम्या रांजणांत जाऊन लपून बसला. कोणी ते रांजण तपासून पाहिले नव्हते. अग्निदिव्याच्या रात्रींच त्याचे साथीदारांनीं ते वाहून नेले. त्यांतून तो निसटला असला पाहिजे. मृदुलेला देखील तो याच रांजणांतून पळवून नेणार होता.

त्या निष्कर्षाला पुष्टि देऊन कांहीं म्हणाले कीं आपण त्याला तेथून दहा कोसांवर नर्मदा उतरून पैलतीराला जातांना पाहिलें. कदाचित् गढीचे चोरवाटेनें तो त्या बाजूला पळून गेला असला पाहिजे.

कांहीं म्हणाले प्रत्यक्ष कलीच रमणला मोह पाडण्याकरतां सोंग घेऊन आला होता.

"कलीनें सोंग कशाला घ्यावयाला पाहिजे ?" कोणी तरी कर्कश आवाजांत बोललें. रमण दचकून त्या आवाजाच्या अनुरोधानें पाहूं लागला. हंसराजाच्या भेटीच्या आधीं वडाच्या झाडाखालून जसा आवाज आला

होता तसाच तो आवाज होता. रमणनें तो आवाज पूर्ण ओळखला. तो लटलटा कांपूं लागला.

" तुमच्यांतील कांहीं मानवांकडे पाहिलें कीं ते प्रत्यक्ष कलीच आहेत असें मला वाटतें. त्यांचा सहवास घडला कीं, घरादाराचा उन्हाळा झालाच म्हणून समजा. मोह दाखवून सत्यानाश करणें हें त्याचें या जगांतील पवित्र कर्तव्य. तुमचा योगी त्या जातीचा मनुष्य असला पाहिजे. त्याशिवाय एका सुखी कुटुंबाचा असा सत्यानाश झाला नसता."

रमण व सर्व लोक गर्दीतून ज्या बाजूनें आवाज ऐकूं येत होता त्या बाजूकडे टवकारून पाहूं लागले. सर्वांना आवाज ऐकूं येत होता. पण कोणी मनुष्य मात्र दिसत नव्हतें. इतक्यांत एक जटाजूटधारी उंच डाल बैरागी रमणला दिसला. त्याचे दाढीमिशीमुळें त्याचें तोंड झांकलें होतें. पण त्याचे डोळे असामान्य होते. रमणनें त्याला ओळखलें.

" महाराज, हंसराज महाराज, क्षमा करा. कृपा करा. माझी बाळे मला द्या. आपलें सामर्थ्य खर्च करा."

रमण बैराग्याचे पाय धरण्याकरितां धांवत सुटला. कांहीं लोक काठ्या, बडगे सावरून त्याला मारण्याकरितां धांवले. ते ओरडले—

" पकडा त्या हरामखोराला. धरा, धरा."

परंतु किरणांत दिसलेला धूर, किंवा जाग आल्यावर स्वप्न जसें हवेंत नाहींसें होतें तसा बैरागी त्या संध्याकालीन किंचित् आरक्त अंधःकारांत अदृश्य झाला. कोणी त्याला पकडूं शकलें नाहीं.

रमण त्याचे मागून वडाचे झाडाकडे धांवत सुटला, तेथें त्या वेळीं खूप अंधार झाला होता.

" हाः हाः हाः " वडाचे झाडाखालून विकट हास्य ऐकूं आलें.

" महाराज, माझीं बाळें मला परत द्या."

" रमण, तूं पगला आहेस. आतां कुठलीं तीं तुझीं? आतां तीं मृत्यूचीं झालीं आहेत. परमेश्वराला देखील तीं जिवंत करतां यावयाचीं नाहींत."

" नीचा, दुष्टा, मीं तुझा काय अपराध केला होता? निष्कारण माझ्यावर वैर कां साधलेंस?"

" हाः हाः हाः मोह, मोह ! रमण ! मोह व वासना यांना बळी कां पडलास ? तुझा तूंच वैरी झालास ! खरें सुख, खरा आनंद टाकून चकाकणाऱ्या धातूंच्या व गारगोट्यांच्या मार्गे कां लागलास ? तुम्हीं मनुष्य आपल्याला खरें सुख कशामुळें लागेल याचा चुकूनसुद्धां विचार करीत नाहीं. फक्त दुसऱ्यासारखे आपण कसे श्रीमंत होऊं, त्याला वैभवांत कसें हटवूं, या अहंकारानें फुकट मरतां व आपला आनंद गमावून बसतां. मला लोक निष्कारण शिव्या देतात, पण मी कोणाचें कांहीं वांकडें करीत नाहीं. मनुष्य स्वतःचा स्वतःच वैरी आहे."

" तूं मोहाकरितां मला वाटेल ती शिक्षा करावयाची होतीस. पण माझीं बाळें कशाला मारलींस ?"

" हाः हाः ! तुला तळमळत ठेवण्याकरितां. घे ' पुरुषस्य भाग्यम्—साधना—पुरुषस्य भाग्यम्—साधना ' हाः हाः हाः ! "

तो आवाज अंधःकारांतून लांब लांब जाऊन कमी कमी होऊं लागला. पाषाणमय नर्मदातटाकावर त्याचे प्रतिध्वनि अस्पष्ट उमटत नर्मदेच्या खळखळाटांत लय पावले.

बुचकळ्यांत पडलेले लोक म्हणाले, " कोण तो होता ? "

" कलि, कलि ! खास तो कलिच होता."

रमण आपल्याशींच बडबडला व पुन्हां तो भारल्याप्रमाणें पहिल्यासारखा आपल्या गादीवर जाऊन बसला.

इतक्यांत रमणच्या दारासमोर एक शिग्राम येऊन उभा राहिला. त्यांतून पहिल्या खेपेच्या अनुक्रमानें व पद्धतीनें-सर चमनलाल व लेडी चंपावती उतरल्या. रमण त्यांना पहिल्यासारखा सामोरा गेला नाहीं. तो विषण्ण मनानें दगडाचे पुतळ्याप्रमाणें जागींच बसून राहिला होता.

लेडी चंपावतीच्या हातांत एक मखमालीची कासकेट होती. ती त्यांनीं शिग्रामाच्या दिव्याच्या उजेडांत उघडली. कासकेटमध्यें एक हिऱ्याचा बांगडे जोड चकाकत होता.

" तुझी खिस खिस फार. तूं सोनाराकडे वेळ लावलास म्हणून आपल्याला रात्र झाली." सर चमनलाल म्हणाले.

" रात्र झाली तर काय हरकत झाली ? पण मी बांगडीजोड कसा बेताचा घडवला आहे. त्याचा कांहीं तोंडांतून उच्चार नाहीं. मी मृदुलेला सारी एकदांच पाहिली. पण माझा अंदाज कधीं चुकावयाचा नाहीं. बांगड्या तिच्या हातांत कशापण बसतील ! सर चमनलाल, तुम्हीं पैज खात्रीनें हरणार. बांगड्या खास घट्ट होणार नाहींत."

सर चमनलाल दुकानांत आल्यावर रमणनें त्यांचे गळ्याला मिठी मारली व तो शोक करूं लागला. जमलेल्या लोकांनीं त्यांना सर्व हकीकत सांगितली.

" अरे अरे, बेटा हेमचंद्रा, बेटी मृदुला, कसा रे तुमचा घात झाला ! काय हें आमचें नशीब ! आमच्या पापी संपत्तीची तुमच्यावर सावली नको म्हणून हेमचंद्राला मानसपुत्र करण्याचा बेत आम्हीं रहित केला. त्याला रुईचा धंदा शिकवावयाचा, त्या धंद्यांत त्याला वाकबगार करावयाचें व त्याला पुढें आणून श्रीमंत करावयाचें असें आम्हीं ठरवलें. पण काय ही भयाण विघिघटना ! रमण, तुझी पुत्रसंपत्ति पाहून माझे मनांत तुझेबद्दल हेवा उत्पन्न झाला होता. मला वाटलें कीं काय तुझें समाधान ! कोट्याधीश असूनहि मी त्याला पारखा होतों. मला वाटलें दुनियेच्या पाठीवर तुझ्यासारखा सुखी कोणी नसेल. मग चांडाळा, कशाकरितां हें अघोर कर्म केलेंस ? "

" लोभ, मत्सर, वासना व त्याकरितां केलेली द्रव्याची साधना."

पुणें, ७–१–१९४०.

## जगण्याचा हक्क : : : ४

" रडणें हा आमचा जन्मसिद्ध हक्क आहे व आम्ही रडणार ! " असें जरी माझ्या आळींतील कारस्थ्यांचें मत होतें तरी माझी आळी बरीच शांततेची होती. पण अलीकडे तीनचार रात्रीं रडण्याचा, केकाटण्याचा, ओरडण्याचा असा आवाज ऐकूं येऊं लागला होता. त्यामुळें माझ्या आळीकरांची झोंप पार बिनसून गेली होती. रात्रीं झोंप न आल्यामुळें ते या कुशीवरून त्या कुशीवर होतांना त्या केकाटणाऱ्या प्राण्याला मनांतून खूप शिव्या देत. उजाडलें कीं तो आवाज बंद होई. रात्र होऊन निजानीज झाली कीं तो आवाज पुन्हां सुरू होई. आळीकरांनीं दिवसा उजेडीं त्या केकाटणाऱ्या प्राण्याला शोधण्याकरितां जंगजंग पछाडले. पण तो कांहीं सांपडला नाहीं ! रात्रीं थंडीचा कडका सपाटून पडे व बाहेर काळाकुट्ट अंधार ! त्यामुळें रात्रीं घराबाहेर पडून त्या प्राण्याचा शोध करण्याची कोणाची छाती होत नसे. अगदींच जे कोणी शूर होते ते डोक्याला लोकरीच्या गळपट्टयाची टापशी बांधून खिडकीचें दार किलकिलें करीत व लांबूनच त्या प्राण्याच्या अंगावर ओरडून व त्याला शिव्या देऊन गप्प राहण्याबद्दल दमदाटी देत. परंतु तो आवाज कोणत्या बाजूनें येतो हें न कळल्यामुळें ते बिचारे गोंधळून जात. एकदां तो आवाज दक्षिणेकडून तर एकदां उत्तरेकडून, एकदां पूर्वेकडून तर एकदां

पश्चिमेकडून, असा येई. अशा तऱ्हेनें ओरडून ओरडून दमल्यावर कंटाळून ते बिछान्यावर येऊन अंग टाकीत व पुनश्च झोंपण्याचा प्रयत्न करीत.

यांप्रमाणें तीनचार दिवस गेले. थंडीचा कडका खूपच पडला होता. मी अंमळ उशिरांच उठलों होतों. ती सकाळची नऊ वाजण्याची वेळ होती. गर्दी जमल्यामुळें आळीच्या रस्त्याची रहदारी बंद झाली होती. पोरें-सोरें म्हातारीं-कोतारीं सकाळीं उन्हांत गर्दी करून उभीं होतीं. रस्त्याच्या चौकांत एका बाजूनें मोटार, दुसऱ्या बाजूनें खटारा, तिसऱ्या बाजूनें खूप मालानें भरलेली मोटार लॉरी अशीं वाहनें उभीं होतीं. त्यांत भरीला पायदळ झालेले सायकलस्वार आडव्या सायकली करून उभे होते.

चौकाच्या मध्यभागीं थंडीनें गारठलेलें कुत्र्याचें एक इकलुसवाणें पोर शेपटी वर करून उभें होतें आणि गर्दीवर धाव धावून भुंकत जात होतें. तीन रात्रीं जाग्रण याच पिलानें पाडलें होतें. थोडक्यांत चुकलें, नाहींतर मालाची लॉरी त्याच्या अंगावरूनच गेली असती !

लॉरीचा मुसलमान ड्रायव्हर गोंड्याची तांबडी टोपी मागें सारून एक पाय लॉरीच्या बाजूच्या फळीवर ठेवून उभा राहिला होता. शेजारचे केरू-नाना कुत्र्याच्या जवळ शिपटी आपटून त्याला पिटाळण्याचा प्रयत्न करीत होते व तें पिल्लूं गुर्र करीत टरेंबाजीनें शेपूट वर करून त्यांच्या अंगावर धावून जात होतें. तें पिल्लूं केरूनानांच्या अंगावर धांवून गेलें कीं नाना टुण्‌दिशीं उडी मारीत व लोक गंमत झाली म्हणून खो खो हंसत. तें पिल्लूं उचलून बाजूला ठेवण्याची कोणाचीहि हिंमत नव्हती. कारण लोक ओरडत होते कीं, 'तें पिसाळलेलें आहे.' प्रत्येकाला आपल्या जिवाची भीति वाटत होती. शिवाय तें पिल्लूं घाणीनें लडबडलें होतें. त्याला लूत लागून त्याच्या अंगावरचे केस झडले होते. त्यामुळेंहि त्याला हात लावण्याची प्रत्येकाला किळस वाटत होती.

तें कुत्र्याचें पोर जणूं काय समस्त मानव जातींला "छाती असेल तर मला ठार मारून तर पहा !" असें आव्हान देत होतें. आपला हीनपणा, दुबळेपणा आणि मनुष्यजातीचा भेकडपणा यांचा फायदा घेऊन तें आपला बचाव करीत होतें. जणूं काय तें म्हणत होतें, "कँव, कँव, कँव, भो...भो गुर्रगुर्र ! जगणं हा माझा हक्क आहे. तुमच्या इतकंच

मलाहि जगावं असं वाटतं. मीं मरावं आणि तुम्हीं जगावं असं तुम्हांला कां वाटतं ? तुमच्यांतील जरत्कारू, व्याधिग्रस्त, म्हातारेकोतारे; लुलेपांगळे जगण्याची धडपड करतात, मग मी काय पाप केलें आहे ? तुमच्या आळींतील लठ्ठंभारती पहिलवान धरणीला भार होत नाहीं, मग मी काय जड आहे ? तुमच्या आळींतील चालतो चालतां भांडण लावणारा तो कळलाव्या पिसाळलेल्या कुत्र्यापेक्षांहि विषारी आहे. त्याला तुम्ही गोळी घालून कां ठार करीत नाहीं ? दुसऱ्याचं दुःख पाहून तुम्हांला कांहींच वाटत नाहीं ! बैलाच्या खांद्यांतून किवणं पडलीं तरी तुम्ही त्याला गाडीला जुंपतां; पण तुमच्या पायांना कुसळ बोचलं तर तुम्ही डॉक्टरला शरण येतां ! त्यांना तुम्ही आपल्या तब्येतीचं मान आळवून इळवून सांगतां. जरा कुठं कसली साथ आली कीं तुम्हीं त्या रोगाची प्रतिबंधक लस टोचवून घेतां ! तुम्हांला जगण्याची इच्छा आहे, मग मींच काय पाप केलं आहे ? पाहिजे तर तुम्हीं मला वाईट नांव द्या व मग फांशीं द्या. मीं सत्य तेंच बोलतों. मला पण जगण्याची इच्छा आहे. सर्व प्राणिमात्रांप्रमाणें माझा पण जगण्याचा हक्क आहे. भोः भोः कॅंव...कॅंव..."

शेजारच्या एका फाटकांतून दासोपंत, रिटायर्ड अव्वल कारकून, मॅजिस्ट्रेट वर्ग ३, कंबरेवर हात देऊन आपले मूळचे बारीक डोळे आणखी बारीक करून या प्रकाराकडे लक्षपूर्वक पाहत होते. सहस्ररश्मीच्या कोवळ्या किरणांत त्यांचें टक्कल पडलेलें बोडकें चकाकत होतें. जणूं काय चक्चक् चकाक् चक् असे प्रकाशदर्शक यंत्राचे ( Helio-graph ) संदेश पाठवून केरूनानांना त्या कुत्र्याला ठार मारण्याचा ते हुकूम फर्मावीत होते ! केरूनानांनीं तो संदेश घेतला नाहीं. तेव्हां दासोपंत नोकराच्या अंगावर ओरडले—

" पांड्या, बंबांतलं उकळतं पाणी आण ! "

सर्वांचीं अंतःकरणें थरारलीं. पण त्याच वेळीं कुत्र्याच्या केकाटण्याची गंमत पाहायला मिळणार म्हणून सर्वांना मनांतून आनंद झाला होता !

इतक्यांत दासोपंतांच्या परड्यापलीकडील घरांतील म्हाळसाबाई नांवाच्या एका गरीब विधवा बाईचा एकुलता एक मुलगा दिगंबर पुढें सरसावला. दिगंबर नांवाप्रमाणें खरोखरच दिगंबर होता. तो फक्त लंगोटी नेसला होता.

" वा वा ! बरं झालं, दिगंबर आला ! आमचा दिगंबर शूर आहे हो ! त्याच्याशिवाय हें काम होणार नाहीं. दिगंबर पकड त्या कुतरड्याचं तंगडं नी दे त्याला तिकडे भिरकावून ! रांडलेकानं तीन रात्रीं नुसतं डोसकं उठवलं आहे !" दासोपंत म्हणाले.

आतांपर्यंत दासोपंतांनीं दिगंबरला ' दिग्या 'शिवाय कधीं हांक मारली नव्हती. त्या दोघांतून कधीं आडवी आग गेली नव्हती. पण आज दासोपंत दिगंबरला हरभऱ्याच्या झाडावर चढविण्याचें राजकारण लढवीत होते. त्यांना वाटलें, पिसाळलेल्या कुत्र्याचं पोर दिग्याला डसलं तर काय बहार होईल ! या पण रांडलेकानं खोड्या करून मला भंडावून सोडलं आहे. नाहीं परड्यांत फूल राहूं देत कीं पान ! मॅजिक लँटर्न करायला खिडक्यांचीं भिंगं लांबवतो ! आंब्यांच्या फळांना खडे मारतो."

दिबंगरनें तिरस्कारयुक्त नजरेनें एकदां दासोपंतांकडे पाहिलें आणि तो कांहींएक न बोलतां त्या गर्दीच्या कड्यांत घुसला. दया व करुणा यांनीं त्याचे डोळे भरून आले होते. थोडा वेळ तो त्या कुत्र्याकडे पाहत उभा राहिला व नंतर तो खालीं बसला. पंजानें जमिनीवर सारखीत त्यानें " कूकू...यूयू... " करून प्रेमानें त्या पिलाला बोलावलें. त्या पिलाला खरा खेळगडी मिळाला म्हणून आनंद वाटला. तें धांवत त्याच्या समोर येऊन उभें राहिलें. त्यानें हुलकावणी दाखवून बागडण्याकरितां आपले पुढील पाय ताठ करून मागील पाय आणि पेंकाट उंच उभारलें व जातिवंत कुत्र्याच्या रीतीभातीस अनसरून आपला एक कान उरफाटा करून उलटला.

दिगंबरला आनंद वाटला. तो खुदकन् हंसला. मुसलमान लॉरी ड्रायव्हरहि हंसला. दिगंबरनें तें कुत्र्याचें पोर उचलून पोटाशीं धरलें. त्या पिलाला दिगंबरच्या पोटाची ऊब मिळाली म्हणून आनंद वाटला आणि त्यानें आपला धनी ओळखून त्याचें वाकलेलें तोंड चाटण्याचा प्रयत्न सुरू केला.

दिगंबरनें तें कुत्र्याचें पोर नाचत, बागडत आपल्या घरांत—नव्हे खोपटांत—नेलें. एक पैशाची साबणाची वडी आणून त्याला स्वच्छ धुऊन काढलें. आपल्या वांटणीचें तामलींतील दूध त्याला पाजलें. त्यानें तें पिलूं हुशारलें व कृतज्ञतेनें 'कू कू' करीत तो जिकडे जाई तिकडे त्याच्या मागोमाग जाऊं लागलें. दिगंबरनें एका खोक्यांत गवत व पोतीं घालून त्याची बसण्याची जागा केली व त्याच दिवशीं त्याच्या वर्गाच्या 'रीडर'मधील कुत्र्याच्या धड्यांत जसें विलायती कुत्र्याच्या घराचें चित्र दाखविलें होतें तसें घर बनवण्याचा खटाटोप सुरू केला. त्याच्या टोळींतील बाळमित्र त्याच्या हाताखालीं काम करूं लागले.

याप्रमाणें तो दिवस निघून गेला. संध्याकाळीं सर्व मित्रमंडळींनीं त्या पिलाचें बारसें केलें. बहुमतानें त्याचें नाव 'पाप्या' ठेवलें. त्यांनीं पाप्याचीं नखें मोजलीं, तीं शुभलक्षणी एकवीस भरलीं. त्यामुळें त्यांना विशेष आनंद वाटला. सर्वांच्या समक्ष आपला अभिजात शत्रु दिग्या यानें पाप्याला जीवदान दिलें व भूतदया दाखवून आपल्याला खजील केलें हें शल्य दासोपंतांच्या हृदयांत रुतून बसलें.

दुसऱ्या दिवसापासून दिगंबर पाप्याची शुश्रूषा आणखी जोरांत करूं लागला. जो पहिला रविवार आला त्या रविवारीं जुन्या बाजारांतून त्यानें पाप्याकरितां एक साखळी व सुंदर पट्टा विकत आणला.

थोड्याच दिवसांत पाप्या टुकटुकीत दिसूं लागला. त्याची लूत बरी झाली. त्याला सुंदर झांबरी लव आली. तो खूप वाढला व मोठा दिसूं लागला. त्याचे केसाळ कान अगदीं झुलपिकारखान झाले. त्याचा गोंडेदार शेपटा डौलांत हलूं लागला. त्याला दिगंबरनें निरनिराळे खेळ शिकवले. तो पाण्यांत फेकलेला चेंडू पोहत जाऊन आणी. दिगंबरच्या मागोमाग तो सभ्य गृहस्थासारखा जाई. तो अगदीं शाहणा माणूस झाला.

श्रीयुत दासोपंत हे सरकारचे सेवानिवृत्त पेनशनर होते. त्यांचा जन्म खर्डे घासतां घासतां कारकुनींत गेला होता. परंतु सेवानिवृत्त होण्याच्या आधीं तीन महिने एक अव्वल कारकून आणि मॅजिस्ट्रेट वर्ग ३ एकाएकीं वारले. त्या जागेवर दुसरा मनुष्य येण्याला बराच अवधि लागणार होता. सबब त्यांच्या वरिष्ठ ऑफिसरनें मोठ्या मेहेरबानगीनें त्यांना ती संधि दिली

होती. दासोपंतांनीं पेन्शन घेतल्यानंतर आमच्या आळीला घर बांधलें व आपल्यासारख्याच बारीक डोळ्यांच्या, विरळ केसांच्या कुरूप मुलांचे लाड करीत व आपल्याजवळचें डबोलें सांभाळीत ते आमच्या आळींत काल-क्रमणा करूं लागले. या अव्वल कारकुनीच्या अभिमानानें त्यांनीं आपल्या घरावर ' दासोपंत, रिटायर्ड अव्वल कारकून व मॅजिस्ट्रेट वर्ग ३ ' अशी पाटी लावली.

दासोपंतांजवळ किती डबोलें होतें हें कोणास सांगतां येणार नाहीं. पण त्यांनीं आपल्या घराच्या खिडक्यांना लावलेले जाड लोखंडी गज व जाळ्या यांवरून तें बरेंच असावें. दासोपंतांच्या सहासात मुलांचें कुटुंब लक्षांत घेतां एवढें डबोलें पगारांतील बचत म्हणून सांचणें शक्य नव्हतें. ज्या अर्थी ते आपलें डबोलें उघड रीतीनें कुठें बँकेंत किंवा शेतींत किंवा व्यापारांत गुंतवीत नव्हते, किंवा ज्या अर्थी त्याची कुठें चर्चा होऊं नये अशी ते दक्षता बाळगीत होते त्या अर्थी वाममार्गानें त्यांनीं कोठेंतरी डल्ला मारून ती कमाई केली असावी असा संशय येणें साहजिकच होतें. त्या डबोल्याचें ओझें चोवीस तास त्यांच्या डोक्यावर कोणींतरी दिलें आहे अशी त्यांची मुद्रा असे. त्या डबोल्याकरितां ते घराच्या कुठें बाहेरहि पडत नसत !

दिगंबरचें परडें त्यांच्या परड्याच्या बरोबर मागोमाग होतें. पाप्या आपल्या स्वभावधर्मास अनुसरून धार्मिक कर्में उरकण्यास नेमका दासोपंतांच्या परड्यांत येई. दासोपंतांना कुत्र्याचा भारी तिटकारा असे. आणि अशांत जेव्हां पाप्या त्यांच्या परड्यांतील फुलझाडांचे दांड उकरून खड्डे बनवूं लागे किंवा पोटदुखीवर औषध म्हणून चतुर्थीकरितां राखून ठेवलेल्या दुर्वा खाई तेव्हा तर त्यांच्या तळ-पायांची आग मस्तकाला पोंचे ! ते नेहमीं हातांत दांडूक घेऊन पाप्याच्या पाळतीवर बसत. पाप्या दिसला रे दिसला कीं ते त्याला दांडकानें होलपाटून मारीत. पाप्यानें आपल्या हद्दींत अनधिकारानें पाऊल टाकून अतिक्रमण करूं नये म्हणून दिगंबरचें परडें व आपलें परडें यांच्यामध्यें त्यांनीं मजबूत कुंपण घालून मॅजिनो लाइन तयार केली. तरीपण पाप्या कुंपणांना बोळ पाडून आपले ठराविक कार्यक्रम पंतांच्या हद्दींत करी. पाप्याहि पंतांच्या-

वर डूक ठेवून होता. दिगंबरचीं व पंतांचीं पाप्यावरून भांडणें जुंपत. दिगंबर लहान तोंडीं मोठा घास घेऊन पंतांना अद्वातद्वा बोले.

" कुत्रीं पाळायचीं आणि घाण मात्र लोकांच्या परडयांत ! मालकानं आपलं कुत्रं गळ्यांत बांधावं. दिग्या कार्ट्या, पुन्हां तुझं कुत्रं इकडं आलं तर थोबाडून टाकीन. " दासोपंत एक दिवस दिगंबरच्या अंगावर ओरडले.

" बघा तर खरं मारून ! मी पण दाखवीन तुम्हांला काय तें ! माझे हात कांहीं केळीं खायला गेले नाहींत !" दिगंबरनें उर्मटपणानें उत्तर केलें.

दासोपंतांनीं दिगंबरच्या हद्दींत येऊन त्याची मानगूट पकडली आणि ते त्याला बेदम मारूं लागले. शेजारचे चोंबडे केरूनाना खिडकींतून तोंड बाहेर काढून ओरडूं लागले,

" पंत, चांगला होता कीं नव्हता करा ! चांगली अद्दल घडवा बेट्याला !"

केरूनानांचा देखील दिगंबरवर रोष होता. कारण नुकतेंच ' शहा-शिवाजी ' नाटकाच्या खेळाकरितां त्यानें त्यांच्या पत्नीचें गंगावन लांबविलें होतें. पंतांनीं दिगंबरला बेदम मारलें असतें; पण तिकडून पाप्या नरसिंह अवतार घेऊन धांवत आला, त्याबरोबर पंतांनीं दिगंबरची मानगूट सोडली आणि ते टरटरा घरांत पळाले.

अशा तऱ्हेनें एका बाजूला पाप्या आणि दिगंबर तर विरुद्ध बाजूला दासोपंत व त्यांचें दांडूक असा संग्राम सुरू झाला. पंतांचीं मुलें भेकड असल्यामुळें त्या संग्रामांत भाग घेत नसत. फार झालें तर पाप्याला तीं लांबूनच खडे मारीत. पण पाप्या त्यांची दारापर्यंत पाकट काढी; मग तीं किंचाळून घरांत शिरत. पंतांचें कुटुंब रुक्मिणीकाकू या पाप्याच्या वाटेस जात नसत. फार झालें तर त्या ' हाड् ' म्हणून त्याच्या अंगावर ओरडत. कारण एकदां त्या त्याला मारावयास म्हणून गेल्या आणि त्यांच्या बांगड्या वाढवल्या.

वास्तविक दिगंबर सालस आणि हुषार मुलगा होता. वर्गांत त्याचा पहिला नंबर असे. पण तो जितका हुषार होता तितका द्वाड होता. तो एकदां पिसाळला म्हणजे मग कांहीं विचार करीत नसे. त्यानें आपल्या विटया दासोपंतांच्या कौलारावर घालवून त्या काढण्याच्या मिषानें कौलें फोडावींत; रबराचा चेंडू दासोपंतांच्या ताटव्यांत फेकून पाप्याला तो आणा-

वयास सांगावें; म्हणजे पाप्याच्या धक्क्यानें साहजिकच झाडें मोडत व कुंड्या फुटत. रात्रीं दासोपंतांच्या घरावर दगड फेंकून चोर आल्याचा भास उत्पन्न करावा व दासोपंतांना घाबरें करावें. दासोपंत या त्रासानें कंटाळून गेले.

मग त्यांनीं दिगंबरला, म्हणजे पर्यायानें म्हाळसाबाईना, कायदेशीर त्रास देण्यास सुरुवात केली. त्यांनीं दिगंबरच्या परड्यांत आपला उकिरडा माजवण्याचा व त्यानें लावलेल्या चिमुकल्या बागेंत घाण पाणी सोडण्याचा हक्क प्रस्थापित केला. समाजप्रिय मनुष्याचें सभ्यतेचें लक्षण म्हणून कायदा उत्पन्न झाला; पण त्यांतूनच समाजाला घातक असे मुद्दे निघूं लागले. दिगंबरच्या परड्यांत मनस्वी घाण होऊन त्याचें आधींच फिरलेलें डोकें जास्त बिथरलें. त्यानें आपला रबरी चेंडू दासोपंतांच्या अंगणांत पापड-कुरड्या वाळत घातल्या होत्या त्यांत फेंकला. पाप्या धांवत चेंडू आणण्या-करितां अंगणांत गेला आणि त्यांत तो बागडला आणि लोळला. त्यानें पापडांचा चुरा झाला आणि सर्व वाळवण विटाळून गेलें. दासोपंतांनीं सर्व पापडकुरड्या गहजब करून दिगंबरच्या परड्यांत त्यांनींच उकिरडा माजवला होता त्यावर सर्वांसमक्ष फेकून दिल्या. आळीकरांनीं पंतांची बाजू घेऊन म्हाळसाबाईंची खूप निर्भर्त्सना केली. त्या खूप रागावल्या. पाप्याला व त्याच्या धन्याला त्यांनीं खूप चोप दिला. दिगंबरहि आपल्या अपराधानें ओशाळून गेला व त्याला पश्चात्ताप झाला. त्यानें पापड-कुरड्यांच्या साहित्याची टोपली पंतांच्या दारांत नेऊन ठेवली. ती पंतांनीं लाथ मारून उडविली.

दुसरे दिवशीं पंतांनीं पाप्याच्या सर्व खोड्या, अपराध व गैरवर्तणुकी यांच्या नामावळीचा एक अर्ज लिहिला व त्यावर सर्व आळीकरांच्या सह्या घेऊन तो पोलिसकडे सुपूर्द केला.

तीनचार दिवसांनीं सकाळीं दिगंबर परड्यांत कामट्या ताशीत बसला होता तेथें पाप्या पायांत शेपटी घालून धांपा टाकीत आला व त्याच्या-मागें दडून बसला. दिगंबरला वाटलें, पाप्या पंतांना भ्याला. पाप्यानें अद्याप कोणापुढें शेपूट घातलें नव्हतें.

"पाप्या, त्या थेरड्यापुढं शेपूट घातलीस!" तो चिडून मोठ्यानें ओरडला.

इतक्यांत त्याला पाप्याप्रमाणेंच दुसऱ्या कुत्र्यांचा तांडा जीव खात पळतांना दिसला. आतां दिगंबरला कळलें, कीं पाप्याजीराव कां घाबरले तें. कुत्रीं मारणाऱ्या सार्जंटाच्या चिरूटाचा आणि तीन दिवस आंघोळ न केलेल्या घामाचा वास गांवांतील सर्व कुत्र्यांना पाठ होता. दिगंबरनें पाप्याला लपविण्याकरितां दरवाजा उघडला तोंच पोलीससार्जंट व पंचा नेसलेले उघडेबोडके पंत कंपाउंडच्या फाटकांत येऊन उभे राहिले. मागोमाग केरूनाना व आळींतलीं पोरें होतीं. पंत साहेबांशीं ठेसण-मास्तरी इंग्रजी बोलत होते. पाप्याकडे बोट दाखवून ते म्हणाले,

" हाच तो मंग्रल. रास्कल ! मोस्ट मिश्चुअस् ! "

दिगंबर पाप्याला पोटाशीं कवटाळून बसला. तो सुंदर इंग्रजींत बोलला,

" साहेब, पहिल्या प्रथम मला गोळी घाला नी मग कुत्र्याला. "

" सर, सर, शूट मंग्रल, मंग्रल." पंत किंचाळले.

" साहेब, तो मंग्रल नाहीं, फाइन डॉगी आहे. "

साहेब आपली टू-टू सरसावून पुढें झाला. सगळ्यांना वाटलें, साहेब कुत्र्याला बाजूला ओढून गोळी घालणार. परंतु साहेबाचा चेहरा दयेनें गंभीर झाला. तो उकिडवा बसला व त्यानें पाप्याला गोंजारलें, थोपटलें. तो त्याचीं सर्व लक्षणें तपासून पाहूं लागला. हें चिन्ह ठीक नाहीं असें पाहून पंत ओरडूं लागले,

" साहेब, बॅड डॉग, मंग्रल. "

" You, shut up, old man. It is you who must be shot down ! This is not a mongrel. हा सुंदर Pariah-sheep-dog आहे. माय सनी, याला जरा उभा कर पाहूं. "

धीर येऊन दिगंबरनें पाप्याला उभें केलें. साहेबानें त्याला न्याहाळून पाहिलें.

" Bravo ! What a fine dog ! सनी, पुढल्या महिन्यांत गव्हर्मेंट हाउसवर डॉग-शो आहे. तुझा कुत्रा पहिलं बक्षीस मिळवील अशी माझी खात्री आहे. मात्र म्युनिसिपालिटीचा बिल्ला त्याच्या गळ्यांत घाल. आजच्या आज लायसेन्स घे म्हणजे या थेरड्याचं कांहीं चालणार नाहीं." असें

म्हणून त्यानें आपल्या ट्रू-ट्रूमधील गोळ्या काढून घेतल्या आणि रायफल रिकामी केली.

दिगंबरचे मिडल स्कूल स्कॉलरशिपचे पैसे म्हाळसाबाईच्या पंचपाळ्यांत शिल्लक होते ते त्यानें घेतले आणि त्याच दिवशीं कुत्र्याचें लायसन्स काढून पाप्याच्या गळ्यांत म्युनिसिपालिटीचा बिल्ला लटकावून दिला. पाप्याला तो अलंकार फार आवडला. तो शेपूट वर करून जीभ काढून दासोपंत, केरूनाना यांच्याकडे पाहून ' ल्हाय् ल्हाय् ' करूं लागला. जणूं काय तो त्यांना वेडावण दाखवीत होता. मग त्यानें जबडा पसरून त्यांच्यासमोर एक लांब जांभई दिली आणि तो परत घरीं फिरला. पाप्याला हें दुसऱ्यांदा जीवदान मिळालें. पेनशनर दासोपंतांप्रमाणें जगणें हा त्याचा हक्क नव्हता काय ?

याप्रमाणें पाप्या निर्धास्त होऊन केरूनाना व दासोपंतांच्या नाकावर टिच्चून आळींतून हिंडूं लागला. पुढें आमचे आळींत दुसरें कांहीं सांगण्यासारखें इहवृत्त घडलें नाहीं. परंतु कांहीं दिवसांनीं गांवांत चोरीच्या आवया उठल्या. दासोपंतांचें धाबे दणाणले. ते रात्र झाली कीं सर्व दारांना कड्याकुलुपें घालून, खिडक्या लावून घेत; रात्रभर सगळीकडे दिवे लावून जागत बसत ! जरा खुट्ट झालें कीं कानोसा घेत. चोरीच्या बातमीपासून दिगंबर बाहेर खाट टाकून पाप्याला जवळ घेऊन निजूं लागला. तो फार धीट होता. म्हाळसाबाई तक्रार करीत, पण त्यानें त्यांना जुमानलें नाहीं. खरें सांगावयाचें म्हणजे, त्याच्या घरीं चोर येतील अशी आशा करण्याचें त्याला कांहीं कारणच नव्हतें.

अशा तऱ्हेनें पंधरवाडा लोटला. पण चोरांचा कांहीं पत्ता नाहीं ! झोंपेनें घेरलेले दासोपंत डाराडूर निजूं लागले. सगळ्यांच्या मनांतील चोराची भीति हळूहळू कमी झाली.

एके दिवशीं मध्यरात्र उलटून गेल्यावर झोंपेच्या भरांत दासोपंतांना गलका ऐकूं येऊं लागला. त्यांनीं निजल्यानिजल्या कानोसा घेतला तर कोणी त्यांचें दार ठोठावत आहे व त्यांच्या नांवानें हांका मारीत आहे असें त्यांना ऐकूं आलें. ते खडबडून उठले व त्यांनीं हळूच खिडकी उघडली. लोक ओरडले,

" दासोपंत, चोर ! दार उघडा."

दासोपंतांनीं ताबडतोब खिडकी लावून घेतली. लोक पुनः ओरडले,

" अहो दासोपंत, चोरांनीं तुमचं घर फोडलं. दार उघडा, तुमचं कांहीं गेलं काय तें तपासा."

दासोपंतांनीं कंदील घेऊन घर शोधलं. भिंतीला भगदाड पडलें होतें. विटांची रास झाली होती व कपाटाचें कुलूप मोडलें होतें. कपाटांतील डबोल्याचा डबा नाहींसा झाला होता !

पंतांनीं तोंड बडवून 'माझं सर्वस्व गेलं !' म्हणून गळा काढला. इतक्या अवकाशांत त्यांच्या पत्नीनें दार उघडलें होतें व बाहेर असलेले लोकहि आंत आले होते.

" केरूनाना, बुडालों रे बुडालों ! साफ नागवलों ! सर्वस्व धुऊन गेलं ! माझ्यामागं पोरंबाळं उपाशी मरणार...!"

लोक पंतांचें सांत्वन करूं लागले.

" पंत, घाबरूं नका. चोर पकडला आहे. चोरानं तुमचं डबोलं इथं कुठं टाकलं असेल. आपण शोधून पाहूं."

" काय ? चोर पकडला ? कुणीं पकडला ?"

"दिगंबरनं पकडला ! पाप्यानं तर त्याला फाडून काढलं आहे. आम्ही दिगंबरच्या आरोळ्या ऐकून तिथं जमलों तर दिगंबर चोराच्या छातीवर बसला होता व पाप्या चोराला ओरबाडून चावीत होता."

" आमचा वीर दिग्या तसाच शूर आहे ! आणि पाप्या तर काय ! अहो, प्रत्यक्ष खंडोबा दैवतच." केरूनाना उद्गारले.

याच खंडोबा देवाचा अवतार संपवण्याच्या खटाटोपांत ते कांहीं दिवसांपूर्वी निमग्न होते ही गोष्ट ते पार विसरून गेले !

" चला, चला, आपण शोध करूं. नाहींतर डबा कुणीतरी लांबवील."

हे शब्द दासोपंतांच्या तोंडून बाहेर पडतात न पडतात तोंच दिगंबर आंत आला.

" हें घ्या तुमचं डबोलं, नीट तपासून घ्या. मला संशय आला कीं शेगटाच्या झाडाकडे चोरानं कांहींतरी फेकलं. मीं शोधून पाहिलं तों मला तिथं हा सांपडला."

तो डबा तांब्याच्या धातूचा मोदकपात्रासारखा कळसाचा होता. तो तांबड्या खारव्याच्या तुकड्यांत बांधला होता. पंतांनीं वरचा रुमाल घाई-

घाईनें सोडला आणि डबा उघडला. त्यांत पत्नीचे दागिने, नोटांचीं पुडकीं, सुटे रुपये, सोन्याचे तुकडे व लडी ठेंचून भरल्या होत्या. लोकांनीं फार वेळ त्यांकडे पाहूं नये म्हणून पंतांनीं डब्याचें झाकण घाईघाईनें लावलें व डबा आंतल्या खोलींत बंदोबस्तांत नेऊन ठेवला व बायकोला तेथें उभें राहण्यास बजावलें. मग ते बाहेर अंगणांत आले. तेथें लोकांनीं चोराच्या मुसक्या बांधून त्याला आणलें होतें. त्याला पाहिल्याबरोबर पंत एकदम दचकले. सर्वांना आश्चर्य वाटलें. पंतांना पाहून चोर ओरडला, "साहेब, मी चोर नाहीं. मी साव आहें. माझा माल घेऊन माझ्याविरुद्ध खटला केला या महाराजांनीं. मला तुरुंगांत घातलं. माझीं बायका-पोरं उपाशीं मारलीं. यांचीं पोरंबाळं जगावीं, हे जगावेत, मग काय आम्हीं उपाशी मरावं ! आम्हांला कांहीं जगण्याचा हक्क नाहीं ! "

इतक्यांत पोलिस तेथें आले व त्यांनीं चोराला तुरुंगाकडे चालवलें. चोर ओरडून म्हणाला,

"साहेब, मी चोर नाहीं. माझाच माल न्यायला मीं आलों होतों. सात भाऊ आहोंत आम्ही. एक फांशीं गेला तरी हरकत नाहीं; पण या बेट्याला दाखवूं एक दिवस इंगा ! "

शिपाई चोराला घेऊन जाऊं लागले. चोर ओरडत पंतांना शिव्या देत होता. त्याच्या उद्गारांत प्रामाणिक तळतळाट दिसत होता. खिन्न नजरेनें दिगंबर त्या चोराकडे पाहत होता. त्याला वाटलें, उगाच आपण या चोराला पकडलें !

सर्वांसमोर अपमान झाल्यामुळें दासोपंत खजील झाले होते. वेळ मारून कांहीं झालें नाहीं असें दाखविण्याकरितां ते पाप्याचे लाड करीत म्हणाले,

"भले बहाद्दर, पाप्या, बेटा !" असें म्हणून त्यांनीं त्याचें डोकें गोंजारण्याचा प्रयत्न केला.

पाप्यानें डोळे बारीक केले आणि आपले पांढरे दात बाहेर काढून गुर्र केलें. त्याबरोबर पंतांनीं हात आंखडला. दिगंबरनें त्याला ओढलें व घरीं नेलें.

दुसरे दिवशीं चोर कसा पकडला त्याचीं वर्णनें केरूनाना हातवारे करून सांगूं लागले. लोकांनीं चोराच्या मुसक्या बांधल्यावर आपण त्याला कशी लाथ मारली याचें ते रसभरित वर्णन करीत.

दासोपंतांनीं मोठेपणाचा आव आणला व त्यांनीं म्हाळसाबाईची भेट घेतली आणि त्यांच्या तोंडावर दिगंबरची खूप स्तुति केली. त्या वेळीं त्यांचें आंतर्मन दुसऱ्याच एका विचारांत गढून गेलें होतें. चोरानें त्यांना दम दिला होता, त्यावर त्यांचा अहोरात्र विचार चालू होता. ' हें सातभाई प्रकरण काय आहे? खरोखरच चोराला सात भाऊ आहेत का? ते आपला खून करतील का? मग आपलें कसें होईल? एक वेळ नशिबानें दिगंबरनें आणि पाप्यानें आपणास वांचवलें; दुसऱ्या खेपेला ते वांचवतील कशावरून?'

" म्हाळसाबाई, तुमच्या इमानी कुत्र्यानं मला एकदां वांचवलं, पण माझी अजून भीति गेली नाहीं. तुमचा पाप्या मला तेवढा देऊन टाका ना."

" मला काय करायचा आहे मेला! एका माणसाचं अन्न लागतं त्याला. आणि आहे काय आमच्या इथं सांभाळायला! आमच्या दिगंबरची –पोराची–हौस आहे ती. पण आमचं तें भूत देईल तेव्हां ना! त्याला विचारा तुम्ही."

पंत दिगंबरकडे गेले.

" बाळ, तुझा कुत्रा देऊन टाक पाहूं मला. तुला काय करावयाचा आहे तो?"

" छेः, तुमचं डबोलं मला दिलंत तरी मी तो देणार नाहीं तुम्हाला."

मग पंतांनीं निराळा डाव रचला. पाप्याशीं तह घडवून आणण्याच्या तयारीला ते लागले. पाप्या कांहीं त्यांना जवळ येऊं देईना. पंतांनीं लगट करण्याचा प्रयत्न केला, कीं पाप्या 'गुर्र' करी आणि खेंकसे. त्यांनीं बोलावलें कीं तो त्यांच्याकडे ढुंकून देखील पाहत नसे.

त्यानंतर पंतांनीं पवित्रा बदलला. ते त्याला तूप लावलेल्या पोळ्या घालूं लागले. त्यांच्यासमोर पाप्या पोळ्या हुंगत सुद्धां नसे. पण त्यांची पाठ फिरली कीं तो त्या मटकावून टाकी आणि आपला बालधनी दिगंबर याच्या

घराची राखण सुरू करी. पोळीच्या रतिबानें पाप्याला गालफी रोग झाला आहे असें वाटूं लागलें. त्याचे गालावर गाल चढूं लागले. आपल्या तूप लावलेल्या पोळ्या खाऊन माजत चाललेल्या पाप्याकडे पाहून पंत खूप चडफडत. पंतांना तें सहन होईना.

पाप्याला दोनतीन रात्रीं बांधून ठेवलें कीं त्याला आपोआप आपल्या घरीं बसण्याची संवय लागेल असा विचार करून पंत हातांत लोखंडाचा साखळदंड घेऊन पाप्याच्या पाळतीवर बसले. एके रात्रीं पाप्या त्यांच्या घरासमोर येऊन उभा राहिला. त्याबरोबर चटकन् साखळदंडाचा हूक त्याच्या पट्ट्यांत अडकविण्याकरितां ते गेले. त्याबरोबर पाप्या पट्दिशीं उरफाटा झाला व त्यानें काडकन् पंतांचें मनगट फोडलें. पंतांचा हात रक्तबंबाळ झाला! ते मोठ्यानें ओरडले आणि घेरी येऊन खालीं पडले. लोकांनीं त्यांना घरांत उचलून नेलें व उपचार सुरू केले.

पंतांना फणफणून ताप भरला. तापाच्या भरांत पंत बरळूं लागले,

"कुठं आहे माझं डबोलं? भूः भूः, भोः भोः, कँव कँव."

लोकांना वाटलें, पाप्या पिसाळलेला आहे. पिसाळलेलें कुत्रें चावलें कीं माणूस मरतें असा लोकांचा समज आहे. कोणी पंतांच्याजवळ जाण्यास धजेना. मधून लहर आली कीं पंतांचें भुंकणें चालू होतेंच!

दुसरे दिवशीं मंडळींनीं मोठ्या डॉक्टरला आणलें. त्यांनीं पंतांच्या अंगाला हात लावल्याबरोबर पंतांनीं 'गुर्र' केलें. डॉक्टरसाहेबांनीं पंतांना व पाप्याला तीन दिवस निरीक्षणाखालीं ठेवलें. पण पाप्यांत कांहीं विशेष आढळून आलें नाहीं. पंतांचा बेफामपणा मात्र वाढतच होता!

"छे! हा हायड्रोफोबिआ (Hydro-phobia) नाहीं. हें एक प्रकारचें वेड आहे. याला लायसोफोबिआ (Lysophobia) म्हणतात. मनःक्षोभाचा हा एक परिणाम आहे. यांना महिनाभर तरी वेड्याच्या इस्पितळांत ठेवलं पाहिजे." डॉक्टरसाहेब म्हणाले. "इस्पितळांत जागा मिळेपर्यंत त्यांना नीट बंदोबस्तांत आंतल्या खोलींत नेऊन ठेवा." असें म्हणून डॉक्टर निघून गेले.

मंडळींनीं पंतांना उचलून आंतल्या खोलींत चालवलें.

" माझं डबोलं तुम्ही घेतां काय ? भूः भूः भों ! मी तुम्हांला चावेन. बघा. ओरबाडीन ! " पंत ओरडूं लागले.

ज्या जाजमावर त्यांना निजवलें होतें त्याला पंत बिलगून बसले व तें जाजम वर उचललें गेलें. जाजमाखालीं एक खड्डा उकरला होता व त्यांत पंतांनीं आपलें डबोलें ठेवलें होतें. त्यावर बसून पंत भुंकत होते. पंतांना डबोल्यापासून वेगळें केल्यावर ते फारच जोरानें भुंकूं लागले आणि ते उचलणाऱ्या मंडळींना चावण्याचा प्रयत्न करूं लागले.

आपला कुत्रा चावल्यामुळें पंतांची अशी दशा झालेली पाहून दिगंबराला कमालीचें वाईट वाटलें. पंतांना सुधारण्याला युक्ति काय करावी म्हणून त्यानें कर कर विचार केला. मग त्याला युक्ति सुचली. तो तडक पंतांच्या कुटुंबाकडे गेला व म्हणाला,

" काकू, पंतांना माझं कुत्रं पिसाळलं आहे असा नुसता भ्रम झाला आहे. तो दूर केला म्हणजे ते तात्रडतोब सुधारतील. या लोकांना आणि डॉक्टरला पण भ्रम झाला आहे. मला तुम्ही परवानगी द्या. मी आतां पांच मिनिटांत पंतांना सुधारतों. इकडे मात्र कुणाला फिरकूं देऊं नका."

" बाळ, तुझ्या तोंडांत साखर पडो. माझा बाळ खरोखरीच गुणी आहे. एवढीं लोकांनीं नांवें ठेवलीं पण मीं कधीं तुला बोललें का ? सांग. " काकू म्हणाल्या.

काकूंचे मायेचे बोल ऐकून दिगंबरला दुप्पट अवसान चढलें. तो टुणटुणा उड्या मारीत घरीं गेला व पांच मिनिटांनीं पाप्याला घेऊन आला. पाप्याला पाहिल्याबरोबर पंत आणखी मोठ्यानें ओरडूं लागले.

" पंत, पाप्याला मीं धरलं आहे. तो पिसाळलेला नाहीं. मला कितीतरी वेळां तो चावला आहे. पाहिजे तर तुमच्यासमक्ष मी त्याला वाटेल तितक्या वेळां चाववून घेतों. "

असें म्हणून त्यानें आपला पाठीमागें लपवलेला हात पाप्याच्या तोंडांत घातला आणि दुसऱ्या हातानें त्याचें मुस्कट दाबलें व तो हात पंतांना काढून दाखवला. हात अगदीं रक्तबंबाळ झाला होता. दिगंबरानें पंतांकडे

यावयाच्या आधीं त्यांना फसविण्याकरितां चाकूनें आपल्या हातावर फांसण्या टाकल्या होत्या व तो हात पाठीमागें लपवला होता.

" बघा, पाप्या मला चावला. मला कांहीं झालं का ? आणखी घेऊं चावून ? "

पंत हंसले व उठून उभे राहिले. त्यांनीं दिगंबरला पोटाशीं धरलें व ते म्हणाले,

" नको रे बाळ. माझा सगळा भ्रम नाहींसा झाला आहे. त्या दिवशीं मीं हिरवी तंबाखू जास्त ओढली होती. तुला खरं सांगूं, सरकारी नोकरी धरण्याच्या आधीं मी आचारी–वाढपी होतों. तेव्हां मला ही वाईट संवय लागली आणि मी चोरून हें व्यसन करी. आजपासून तें सगळें वर्ज्य. आतां तूं माझी काळजी करूं नकोस. " असें म्हणून त्यांनीं कपाट उघडलें व आयोडिनची बाटली काढली. ते दिगंबरच्या जखमांना आयोडीन लावूं लागले.

पंतांच्या मनोवृत्तींत पडलेला फरक पाहून पाप्यानेंहि आपला स्वभाव टाकून दिला. तो पंतांना अगदीं खेटून बसला. पाप्या-पंत लढाईचा असा शेवट होऊन त्यांच्यांत दोघांनाहि अपमानकारक होणार नाहीं असा तह घडून आला.

पंतांचा स्वभाव पार बदलला. त्यांची कायदेबाजी गेली. त्यांनीं दिगंबरच्या परड्यांतील उकिरडा साफ केला आणि घाण पाण्याचा ओघ बदलला. म्हाळसाबाईचें परडें साफसूफ केलें. त्यांनीं गव्हरमेंट हाउसवरील डॉग-शोला पाप्याला पाठवण्याची उचल केली. डॉग सोप आणून त्याला आधीं साफ केलें. मग ते व दिगंबर डॉग-शोला गेले. अर्थात् सार्जेटानें भविष्य केल्याप्रमाणें पाप्याला चांगला कुत्रा म्हणून पहिलें बक्षिस मिळालें. १३-१२-१९४१च्या इलस्ट्रेटेड वुइक्लीमध्यें दिगंबर आणि पंत यांच्यामध्यें बसलेल्या पाप्याचें चित्र आलें आहे. तें पाहिजे असल्यास तुम्ही पाहा.

दोन्ही घरच्या प्रेमामुळें पाप्या अगदीं वाघ होऊन हल्लीं सबंध आळीची राखण करीत आहे.

पुणें, २३।३।१९४०.

---

## केळीचें पान : : : : ५

"ठस्-धाड् धप्प्, ठाण्-ठणूठणण ठण्, गडगडगड्, बुडबुडबुड्, फाड् फड्, ठिण् ठिण्-ठिण्, किण् किण् किण्."

कसला बरें हा आवाज ? हा कांहीं जर्मन विमानांचा हल्ला नव्हता, किंवा धरणीकंपहि नव्हता. हा आवाज कशाचा झाला हें ओटीवर बसलेल्या गोदूताईनीं ताबडतोब ओळखलें. आगोठीच्या पहिल्या वावटळीप्रमाणें त्या गडगडत कडकडत माजघरांत आल्या. तों काय ? गडगडाटाच्या आधींच पाऊस पडला होता. माजघरांत व विहिरीच्या पडवींत पाणी सांडून जिकडे तिकडे ओलें झालें होतें. पडवीच्या पायऱ्या चढून माजघरांत शिरतांना कमळेचा पाय घसरला व तिच्या कंबरेवरचीं व हातांतील पाण्याचीं भांडीं, तांदळाची रोवळी वगैरे जिनसा पडल्या आणि पाणी सांडलें. कमरेवरचा हांडा पडला त्याचा ठस् असा आवाज झाला. हांडयावरचें तपेलें कोलांटी मारून उडालें त्याचा धाड्धप्प् असा आवाज झाला. तपेल्यावरची मणिकर्णिका पायऱ्यांवरून अंगणांत गडगडत गेली तिचा ठाण ठाण्-ठण्णण असा आवाज झाला. हातांतील कळशी जमिनीवर पडून तेथल्या तेथेंच फिरली, तिनें गडगडगड्-बुडबुडबुड् केलें. कळशीच्या हातांतील तांदळाची रोवळी निसटली तिचा फाड्-फड् व मणिकर्णिकेवरचा धाकट्या बाळासाहेबांचा गडू व हांड्याच्या हातांत

धरलेली लोटी व फुलपात्र पडलीं त्यांचा ठिण्-ठिण्-ठिण् किण्-किण्-किण् असे आवाज झाले. त्या आवाजांत कमळा पडल्याचा आवाज ऐकूं आला नाहीं. ती माजघराच्या दारांत सपशेल आडवी पडली व तिचें लुगडें भिजून ओलेंचिंब झालें व तें तिच्या अंगाला चिकटलें.

माळ्यावरल्या काळ्या माटीप्रमाणें आपल्या भावजईच्या उण्यांवर टपलेल्या गोदूताईना कमळेवर घसरा घालण्याची चांगलीच संधि मिळाली. त्या जोरांत कचकचूं लागल्या,

" शर्थ झाली बाई या असल्या हुंदाड्याची ! जसं कांहीं कुणी म्हणेल बारा गाड्यांना जुंपलं आहे बाईला. विहिरीवर चकाट्या पिटत बसायचं अन् मग करायची कामाची वेठ ! अग आई ग ! माझ्या मणिकर्णिकेला खोमणा पडला. आईनं नी मीं काशीला हौसेनं तिला विकत घेतली. बारा वर्सं जपलें मीं, पण अखेर बाईनं खोमणा पाडलाच तिला !"

गोदूताईच्या बोलण्याला कांहीं ताळतंत्रच नसे. त्यांचा तोंडाचा पट्टा पावसाच्या आवाजचे वरती ऐकूं येत होता. खूपखूप बडबडल्यावर त्या शेजाऱ्याच्या घरीं बेल घालण्याकरितां निघून गेल्या. घरांत कोणी नव्हतें. मुलें शाळेला गेलीं होतीं. कमळेची सासू पुराणाला गेली होती, सासरे माधवराव शेतावर गेले होते.

हिरमुष्टी कमळा विहिरीच्या दारीं गेली. तिनें आपला गोल आणि सुंदर हात दाराच्या चौकटीला आडसरीसारखा लावला व ती दारांत आडवी उभी राहिली. तिच्या डोळ्यांत अश्रू उभे राहिले. त्यांतील दोन अश्रू जोडीच्या मोत्यांप्रमाणें तिच्या गालांवर पडले. खिन्नतेनें मान खालीं घालून तिनें विहिरीच्या बाजूकडे नजर फिरविली.

दाण्दाण् कोसळणारी म्हाताऱ्याची ( पुष्य नक्षत्राची ) सर नुकतीच थांबली होती. पानांच्या टोकांवर पावसाचे थेंब लोंबकळत राहिले होते. भेंडीवरून, जांभळीवरून, सावरीवरून, आंब्यावरून, जाईच्या कळ्यांवरून पावसाचे थेंब तिच्या अश्रूंप्रमाणें ठिपकत होते. तिच्या दुःखित मनाला रडण्या वर्षाकालानें आणखी दुःखित केलें. तिला वाटलं सर्व जगच रडत आहे. तें तिच्यासारखेंच दुःखी आहे काय ? कोणी पाहील म्हणून तिनें आपले अश्रू चट्दिशीं पदरानें पुसले आणि तोंड दुसऱ्या बाजूला केलें, तेव्हां

तिला तिची केळ दिसली. पावसानें केळ खूप पोसली होती. तिच्या बाजूला चार मुनवे निघाले होते. आणि त्यांचे हिरवे पोगारे पावसाशीं व वाऱ्याशीं खेळत होते.

केळींचें एक मोठें पान वाऱ्यानें फाटलें होते. केळीचें पान किती नाजुक असतें ! जी वाऱ्याची झुळुक वृक्षलतांना डोलवते ती केळीच्या पानाला फाडते ! जी वाऱ्याची झुळुक लोकांना सुखवीत येते, लोकांना गारेगार करते, जी वाऱ्याची झुळुक परागाची वाबटळ आणते, तीच वाऱ्याची लहानशी झुळुक केळीच्या पानाला ताटोळ्यापर्यंत चिरून त्याच्या चिंध्या चिंध्या करतें. अशा वेळीं जेव्हां अलम दुनिया वाऱ्याच्या आल्हादानें सुखी होत असते, त्या वेळीं तिचें हजार ठिकाणीं फाटलेलें हृदय दुःखाच्या पताका वाऱ्याच्या झुळुकीवर उडवीत कांपत राहतें. त्या पानाचा कोणाला उपयोग होत नाहीं. सोपट म्हणून तें कापून काढतात, व त्याला फेंकून देतात ! त्याला जिवंत ठेवण्याचें कारण नसतें. उपयुक्तता हा व्यवहारी जगाचा दंडक आहे.

कांहीं माणसांचीं मनें केळीच्या पानाप्रमाणें कोवळीं व नाजूक असतात. साध्या बोलण्यानें तीं फाटतात, त्यांच्या चिंधळ्या होतात, तीं कायमचीं अधू होऊन जागच्या जागीं मरण पावतात. लाजाळूच्या झाडाप्रमाणें कसलाहि धक्का बसला, कीं तीं आपल्या खुलणाऱ्या कळीच्या पाकळ्या कायमच्या मिटून घेतात; मग पुन्हां जन्मांत त्यांचा चाफा कधीं हांसत नाहीं, बोलत नाहीं !

कमळा ही अशाच तऱ्हेची हळव्या मनाची मुलगी होती. कजाग गोदूताईच्या बोलण्यानें तिच्या मनाच्या चिंधळ्या उडाल्या होत्या. सासरच्या जाचानें तिचें काळीज करपलें होतें व तिच्या तोंडावर औदासीन्याची छाया पसरली होती.

दुःखी कमळा केळीच्या झाडाकडे पाहात होती. तिनेंच ती केळ लावली होती. तिनें आपल्या माहेरून हौसेनें उत्तम केळीचा मुनवा आणला होता. खुद्द माधवरावांनीं तिला पाहिजे तसें आळें करून देण्याचा गड्याला हुकूम दिला होता. त्यानें मोठा खड्डा करून आळें केलें. गोठ्यांतील खर्वती आणून त्याचें खाजें करून तिनें मातींत मिसळलें व नंतर तो मुनवा लावला.

उन्हाळ्यांत व पावसाळ्यांत ती कितीहि दमलेली असो तिच्या केळीच्या कळशा कधीं चुकल्या नाहींत. केळीचा खुंट लावून कमळा सासरची दौलत वाढविते आहे, या एकाच गोष्टीच्या बाबतींत मात्र गोदूताई कमळेवर खूष असत. शेजारच्या गंगूबाई, चिंगूबाई पुरणाच्या तेलपोळ्यां-करितां केळीचें पान मागावयास आल्या कीं त्या त्यांच्या अंगावर खस्कन ओरडत,

" कमळाची आहे हो ती. तिला विचारल्याशिवाय तुम्ही हात लावूं नका केळीला. पोर उरापोटावर पाणी घालते तेव्हा कुठं डोळ्याला हिरवं दिसतं. तुम्हांला काय होतं पानं कापायला ! "

गोदूताई असें बोलल्याबरोबर गंगूताई-चिंगूताईचें पाणी खरकन् उतरे आणि कमळा तेथून निघून जाई. कारण गोदूताईचें हें बोलणें सांकेतिक असे व त्या संकेताप्रमाणें तेथून निघून जाण्याचा हेर हिटलर गोदूताई यांचा हा गर्भित हुकूम आहे असें समजून ती तेथून नाहींशी होई.

शून्य डोळ्यांनीं कमळा केळीच्या झाडाकडे पाहत राहिली. तिला तिच्या माहेरचे देखावे एकामागून एक आठवले. केळी, नारळी, सुपारीची तिच्या वडिलांची वाडी व त्यांतील कौलारू घर तिच्या डोळ्यांसमोर प्रत्यक्ष उभें राहिलें. त्याच घरांत ती आनंदाचे खेळ खेळली. आतां यापुढें तिला आनंदाची आशा राहिली नाहीं काय ? कमळा या विचारांनीं जास्त दुःखी झाली. इतक्यांत तिनें चपापून पाहिलें आणि ती खुदूकन् हंसली. मघाशीं तिच्या गालांवर जेथें दोन अश्रू चमकले तेथें आतां आनंदाच्या दोन खळ्या पडल्या. मग भान न राहून स्वगत म्हणा किंवा ती आनंदाची बातमी गोदूताईच्या कानावर जावी म्हणून म्हणा, ती आपल्या सुकुमार हनुवटीवर हात टेवून आश्चर्यानें म्हणाली,

" अगबाई, माझ्या केळीला लांडं पान आलं ! "

कमळेनें मागें वळून पाहिलें, पण गोदूताई घरांत नव्हत्या. त्या घरां-तून केव्हां गेल्या तें तिला कळलें नव्हतें. आपली केळ व्याली म्हणून तिला काय पण आनंद झाला होता ! दोन्ही हातांनीं दाराची चौकट धरून ती दाराचे मधोमध चौकट लावलेल्या चित्राप्रमाणें उभी राहिली व हर्षभरानें त्या केळीकडे टक लावून पाहूं लागली.

तिची केळ सुंदर होती. त्याच्यापलीकडील देखावाहि सुंदर होता. पावसाळ्यानें जिकडे तिकडे हिरवेंगार करून सोडलें होतें. तसेंच क्षणभर कां होईना, तिचें मनहि गारीगार झालें होतें. तिची केळ हिरवी, त्यापलीकडील भोवरीच्या ताण्यांनीं वेढलेल्या कुंपणी हिरव्या, सिताफळी हिरव्या, त्यावरील फुलें हिरवीं, भाताचीं खाचरें, बांधाच्या कडामेरी, डोंगराच्या पट्ट्या, माळ, दऱ्या, रानें सर्व कांहीं हिरवें! सारी खलाटी हिरवी दिसत होती. जणूं काय खंड्यांवारी हरितरंजक द्रव्य (Chlorophyll) तेथें कुणींतरी ओतलें होतें. त्याच्याशिवाय असली हिरवी जादू कशी होणार?

कमळादेखील हिरवें लुगडें नेसली होती. तिची चोळीहि हिरवीगार होती. दाराच्या चौकटीला धरलेले व कोपरांत वाकलेले तिचे सुकुमार व निघोट हात संगमरवराच्या मिनारांप्रमाणें दिसत होते. शेवाळीनें मढलेला गौरकाय ताजमहालच दारांत उभा आहे असें तिचें चित्र दिसत होतें. ती बेभान होऊन तो देखावा पाहत होती. तिचें ओलें लुगडें अंगावर वाळत होतें, त्याकडे तिचें लक्षहि नव्हतें. तिने कोल्हारांच्या पाकळ्यांप्रमाणें असलेलीं आपलीं निमुळतीं बोटें घालून कांहींतरी मोजलें व ती स्वतःशींच कांहींतरी पुटपुटली आणि हंसली. इतक्यांत पहिल्यासारखा पुन्हां एकदां कडकडाट झाला,

"हद्द झाली बाई! अजून तुझं पाणी भरून झालं नाहीं! मग चुलीच्या डोक्यावर अक्षता कधीं पडणार?"

आपल्या परिचित गोदूताईचा तो आवाज होता. मघां त्या शेजारच्या गंगूताईना भांड्यांना किती खोमणे पडले तें वर्तमान सांगण्याकरितां गेल्या होत्या, त्या आतांपर्यंत तिथें गप्पा छाटीत बसल्या होत्या. त्या घरांत आल्याबरोबर त्यांनीं कमळेची हजेरी घेतली. आसामांतील चहाच्या मळ्यांतील बिनपैशाच्या मजुराप्रमाणें कमळेनें कळशा उचलल्या व ती विहिरीवर गेली.

आशेसारखें अमृत नाहीं. पुन्हां तिचें लक्ष तिच्या केळीकडे गेलें आणि ती पुन्हां गालांतल्या गालांत हंसली. गोदूताईच्या जाचानें फिकट झालेली कमळा पावसाच्या सावटीनें उजळून आणखी फिकट गोरी दिसत होती.

तरीपण आज ती हंसल्याबरोबर तिच्या गालांवर थोडीशी तरी लाली चढली, ती भागीरथीबाई विहिरीवर पाणी भरीत होत्या त्यांनीं पाहिली.

" कां ग हंसलीस ? मीं ओळखलं पण. "

भागीरथीबाईनीं रहाट आडवला होता, त्या रहाटाला हिसडा मारीत पाण्यांतली घागर पाण्यांत दोनतीन वेळां बुचकळीत म्हणाल्या.

" कांहीं नाहीं. मी उगीच हंसलें. काय, खोटं वाटतं आपल्याला ? " कमळा म्हणाली.

" उगीच कशी हंसशील ? पक्की आहेस तूं ! पण मीं पकडली तुझी चोरी ! तूं खूप समज. मीं पकडली तुझी चोरी. "

पोक्त भागीरथीबाई काय बोलल्या तें त्या बालिश कमळेला उमजेना. तिच्या कोषांत चोरीला एकच अर्थ होता. आठ पोरांचा कुसवा झाला तरी भागीरथीबाईचा पाळणा अजून हलतच होता. तेव्हां असला विनोद करण्याचा त्यांना पूर्ण अधिकार होता.

" तें पाहा केळीचं मखर कसं झालं आहे, " कमळा बोलली. " सराईला नुसती मधली जागा सारखून काढली व चौरंग मांडला कीं सत्यनारायणाची पूजा कशी दिसेल असं मनांत आलं म्हणून मी हंसलें ! "

" तर तर ! मला अगदीं भोळी समजतेस कीं नाहीं ! तुला वीस नख्या झाला म्हणजे घालूं आपण सत्यनारायण. मधुसूदनला मी सांगेन पूजेला बसायला. कसा पण तुमचा जोडा छान दिसेल पूजा करतांना ! तूं आंजिरी पैठणी नेस आणि मधुसूदन जांभळा पितांबर नेसेल. "

पडवींत गोदूताई पालीसारख्या ऐकत उभ्या होत्या. भागीरथीबाईचा 'वीस नख्या' हा शब्द त्यांनीं ऐकला. हा 'वीस नख्या' प्राणी कोण ? कमळा गरोदर तर राहिली नाहीं ना ? गोदूताईच्या पोटांत धस्स झालें ! ज्या गोष्टीमुळें लेकुरवाळ्या भागीरथीबाईना आनंद वाटला त्याच गोष्टीचा गोदूताईच्या मनावर उलट परिणाम झाला ! त्या गोऱ्यामोऱ्या होऊन पाय आदळीत आपटीत घरांत गेल्या. भागीरथीबाईना हा कडका लागल्याबरोबर त्याहि कांहीं झालें नाहीं असें दाखवून गचके देऊन रहाट ओढूं लागल्या.

कमळेला दिवस गेले आहेत ही गोष्ट पहिल्याप्रथम गोदूताईंना खरी वाटेना. इतके दिवस नाहीं आणि आतांच कुठून असें होईल ? आपली परीक्षा कधीं चुकणार नाहीं; वांझोटीला कधीं मूल होईल का ?

" काय बाई मुलुखावेगळी तऱ्हा ! विटाळ नाहीं, आतां कांहीं राहिलंच नाहीं ! सगळा अमंगळपणा आणि भ्रष्टाकार ! देवाधर्माची देखील भीति राहिली नाहीं ! " गोदूताई कलकलूं लागल्या.

" अग, काय झालं काय ? " लक्ष्मबाई कडेवर बाळूला घेऊन पुराणाहून आल्या त्यांनीं विचारलें.

" अग, काय ! झालं माझं कर्म ! सारा विटाळ घरांत कालवते. " गोदूताई किंचाळल्या.

"नको बोलूंस ग असं. तुला काय यांतलं कळणार ? मी सांगेन सगळं तुला."

" हो, हो, मला माहीत आहे तूं काय सांगणार तें ! सगळं ढोंग आहे तिचं. मला काय करायचं आहे ! तुझी सून लाडकी आहे तर घे आपल्या डोक्यावर ! " असें बोलून गोदूताई पुन्हां आपलें दिवसांतून कैक वेळां निघणारें बिनछापील गॅझेट प्रसिद्ध करण्याकरितां गंगूताईच्याकडे निघून गेल्या व थोडा वेळ कां होईना घरांतले व्यवहार सुरळीत चालूं लागले.

* * *

तीन वर्षे झालीं होतीं. कुंकवानें रंगलेलीं आपलीं गोजिरीं पाउलें पायघड्यांवर उमटवीत लज्जागौरी कमळानें गजाच्या चालीनें लाजत, ठुमकत, मुरकत, मुरडत आपल्या नवऱ्याच्या घरांत उजळलेल्या चंद्रजोतीप्रमाणें हंसतहंसत प्रवेश केला होता. त्या रात्रीं मधुसूदनच्या नांवावर प्रास उभारून फक्कड उखाणे घेत तिनें वऱ्हाडी मंडळींला चांदीच्या वाटीनें साखर वांटली होती. तिचे उखाणे अजूनपर्यंत दोन्ही लगीनघरच्या मंडळींच्या कानांत घुमत आहेत. दुसरे दिवशीं सकाळीं तिनें आपलें घर न्याहाळलें. त्याच घरांत कांहीं दिवस तिला राहावयाचें होतें. परड्यांतील डवरलेला मोगरा पाहून तिला आनंद वाटला. त्याच्या फुलांच्या वेण्या करून आपण डोक्यांत घालूं असा तिनें बेत केला.

पण त्याच दिवसापासून गोदूताईंनीं कमळेच्या गळ्यांत चूल घातली.

" काय ग आई, तूं नि मीं जन्मभर कष्ट केले, आतां आपण पाहुण्या. आपल्याला नको का पेनशील?" असें उलट मोठेपणानें त्या म्हणाल्या.

कमळेचें बाशिंग सुटल्याबरोबर तिच्या हातांत केरसुणी आली. तिच्या अंगाची हळद निघावयाच्या आंत शेणगोळ्याचें मर्दन तिच्या नशिबीं आलें. पंचरावीस माणसांच्या कुटुंबाचें काम तिच्या अंगावर पडलें. कमळेचें माहेर खाऊनपिऊन सुखी होतें आणि ती बापाची एकुलती एक लाडाची मुलगी होती. तिला काम करण्याची संवय नव्हती. पण ती सुदृढ व हाडापेराची बळकट होती. ती हुषार होती. तिनें काम करण्याकरितां कंबर कसली व आपल्या माहेरचें नांव जाऊं द्यावयाचें नाहीं असा निश्चय केला. ती चपळ व सशक्त असल्यामुळें तिला कामाची किंमत वाटत नसे. म्हणूनच वर वर्णन केल्याप्रमाणें पाण्यानें भरलेलीं इतकीं भांडीं ती सहज स्वयंपाकघरांत एका वेळेला घेऊन येई. पण अलीकडे कमळा शक्तिक्षीण झाली होती. वरून जरी ती निरोगी दिसे तरी आंतून ती निलंघ झाली होती. म्हणूनच तिच्या हातून भांडीं पडलीं.

कमळेनें घरांत पाऊल टाकल्यापासून गोदूताईनीं तिचा पाठपुरावा केला होता. तिनें वरातीच्या दिवसापासून नणंदेचा कायदेशीर हक्क गाजवण्यास सुरुवात केली होती. लक्ष्मीबाईना पण आपली सून कामाचा गाडा कसा ओढते ही परीक्षा घ्यावयाची होती व आपल्याला खोटें बाण लागलें नाहीं ही खात्री करावयाची होती. त्यामुळें व गोदूताई थोरली नणंद असल्यामुळें नव्या नवरीपुढें तिचा कोणीं अपमान करणें शक्य नव्हतें. सुंदर कमळा, अल्लड कमळा, हंसतमुख कमळा आपल्या गुणाच्या बळावर मधूसूदनचें मन पूर्ण हरण करून त्याला ती आपल्या मुठींत खास ठेवणार अशी मायलेकींच्या मनांत धास्ती उत्पन्न झाली होती. पुष्कळ वेळां प्रेमाच्या परमावधीतून द्वेष उत्पन्न होतो तो असा.

बाळपणीं कपाळीं आलेल्या गोदूताईला कमळेचा हेवा वाटत होता. हिंदु समाजांतील बालविधवांच्या मनावर वैधव्याचे पुष्कळ वाईट परिणाम होतात त्याला त्यांचा उपाय नसतो. एकतर त्या सर्व सुखाला अंतरल्यामुळें झुरत असतात किंवा पुष्कळ वेळां वैवाहिक जीवनाच्या अभावामुळें त्यांचें मन त्रासिक व असहिष्णु होत जातें. गोदूताई अशा कोटींत पडत होत्या.

मानसशास्त्राच्या नियमाप्रमाणें त्यांचा दुष्टपणा न कळत वाढलेला होता. वैधव्य आल्यापासून त्या माहेरींच असत. सर्व घरावर, देण्या-घेण्यावर त्यांचीच हुकूमत चाले. त्या म्हणजे एक प्रकरण होऊन बसल्या होत्या ! त्यांत लक्षुमबाई म्हाताऱ्या होत चालल्या होत्या, म्हणून सर्वाधिकार गोदूताईच्याकडे आले होते. " तूं इतकेंच पाणी पी " असें जर त्या आईला म्हणाल्या असत्या तर लक्षुमबाई तेवढेंच पाणी पिऊन राहिल्या असत्या. त्यांनीं कमळेला तावूनसुलाखून घेण्याचें ठरविलें व तिच्या जांचाला सुरुवात झाली. गोदूताईच्यापुढें कोणाची बोलण्याची प्राज्ञा नव्हती. त्यांनीं कमळेला खूप काम द्यावें.

कमळेचें लग्न झाल्यापासून गोदूताईची देवाची भक्ति वाढली. मोगऱ्याच्या यच्चयावत् कळ्या दत्ताच्या हाराला जाऊं लागल्या. त्यामुळें सुवासप्रिय कमळेची वेणी नेहमीं ओकी राही. मधुसूदन मुंबईस मेडिकल कॉलेजमध्यें शिकत होता. तो सुट्टींत आला तर गोदूताईनीं नवराबायकोचें हितगुज होऊं देऊं नये. त्या खेडेगांवचा देखावा नंदनवनासारखा होता. त्याच्या बाजूनें नेत्रानदी शांत वळणें घेत गेली होती. चांदण्या पाकी दुधाच्या समुद्राप्रमाणें चांदणें पडे. गोदूताईनीं परवानगी दिली असती तर ह्या नवपरिणीत जोडप्यानें तो सागर रिकामा केला नसता, पण गोदूताईच्या भीतीनें मधुसूदन कमळेला फिरावयास नेण्यास भीत असे.

अभ्यास बुडेल या सबबीवर मोठ्या सुट्टीखेरीज मधुसूदनला घरीं येण्याची बंदी होती व गोदूताईनीं माधवरावांकडून युक्तीनें त्याला तशी तंबीहि देवविली होती. वास्तविक मधुसूदन माधवरावांचा थोरला मुलगा. त्याला चांगली बायको मिळून आपला वंशवेल उत्तम चालावा म्हणून पुष्कळ मुली पाहिल्यानंतर त्यांनीं कमळेला पसंत केलें होतें. मग या नवप्रेमाच्या जीवनाच्या वाटेवर मोठीं माणसें आडवें मांजर कां पिटाळीत होतीं ? त्याचें कारण त्यांचें जुन्या पद्धतीचें प्रेम. मधुसूदन व कमळा आज्ञाधारकपणाचें दिव्य पार पाडतात किंवा नाहीं हें त्यांना पाहावयाचें होतें. कॉलेजमध्यें ऋतुसंहार व मालतीमाधव कोळून प्यालेला मधुसूदनदेखील ही जाचणूक शिरसावंद्य करीत होता.

मधूच्या लग्नाला तीन वर्षे झालीं होतीं; पण माधवराव व लक्ष्मबाई यांची नातू बघण्याची हौस फिटली नव्हती. ती कशी फिटणार ? निसर्गाचे नियम मनुष्य फिरवूं शकत नाहीं. फूल उमलल्याशिवाय फळ कसें मिळणार ? गोदूताईनीं कमळेला मूलच होणार नाहीं असें ठरविलें. कमळेला मुलगा होईल असा त्यांना नेहमीं दचका असे. कारण तसें झालें असतें तर त्यांचें प्रस्थ व घरांतील राजकारण हीं दोन्ही नाहींशीं झालीं असतीं !

कमळेच्या हातून पाण्याची भांडीं पडल्यानंतर एकदोन दिवसांनीं गोदूताईनीं कुरापत काढून कमळेवरून आईशीं मोठें भांडण केलें व त्या दोन-तीन दिवस उपाशी निजून राहिल्या. कोणाशीं बोलल्यासुद्धां नाहींत. हेर हिटलर जसे अंत:स्फूर्तीकरितां आपल्या डोंगरांतील निवासस्थानांत जाऊन एकान्त करतात तोच प्रयोग गोदूताई करीत होत्या. आईनें त्यांची खूप समजूत केली; पण त्यांनी हूं कीं चूं केलें नाहीं. धाकट्या बाळूनें आपल्या ताता मामा या या अशा तऱ्हेच्या चार शब्दांच्या बेसिक मराठीमध्ये त्यांना उठवण्याचा प्रयत्न केला; तेव्हां त्याच्या पाठींत एक धपका बसला ! त्या दिवशीं दुपारीं कांहींतरी आठवून त्या मनाशींच हंसल्या. मग त्यांनीं आपलें अंथरूण सोडलें आणि झाकून ठेवलेलें अन्न वाढून घेतलें. हें पाहिल्यावर लक्ष्मबाईचा जीव खालीं पडला त्या तिच्या पानाजवळ बसून वाढूं लागल्या. पुन्हां मायलेकींचा प्रेमाचा पाघळ सुरू झाला. संध्याकाळीं त्यांचें तुळशी-अंगणाच्या पडवींत हित-गुज सुरू झालें.

" काय ग, कितवा महिना ? " गोदूताईनीं विचारलें.

" माझ्या मतें दुसरा असेल. " लक्ष्मबाईनीं उत्तर केलें.

" दुसरा कसा ? पहिलाच ! " गोदूताई हुज्जत घालूं लागल्या.

" अग, पहिला कसा असेल ? वटपौर्णिमेच्या आधीं आठ दिवस मधुसूदन नाहीं का मुंबईला गेला ? "

" वटपौर्णिमेला ती बाहेरची होती. "

लक्ष्मबाईचा चेहरा एकदम मावळला. त्यांच्या मनांत चर्रर झालें. त्यांना आठवलें, कीं कमळाचें वटपौर्णिमेचें वाण त्या दिवशीं तसेंच राहिलें होतें ! गोदूताईना विषवृक्षाचा रोपणसमारंभ झालेला पाहून आनंद वाटला.

त्या दिवसापासून कमळेला दुहेरी जाच सुरू झाला. स्वयंपाकाच्याबरोबर धुणें, दळण-कांडण तिच्या गळयांत पडलें. आतांपर्यंत तिला खावयास तरी चांगलें मिळे; पण यापुढें तिच्या पोटाचेहि हाल होऊं लागले. जवळजवळ तिला मोलकरणीसारखें वागवण्यांत येऊं लागलें. रोज पायलीचें दळण तिच्या बोकांडीं बसूं लागलें. दळतांना जात्याच्या तळीला लावलेली तिची पोठरी पिठांत दडून जाई, इतकें तिला दळावें लागे. उरीं फुटलेल्या कमळेची ओवी दम लागल्यामुळें अर्धीच राही. काम करून घशाला कोरड पडली तरी तिला चहाचा ठिपकासुद्धां मिळत नसे.

शेताच्या बांधाबांधावरून कमळाच्या जाचाच्या गोष्टी निघूं लागल्या. माधवरावांचीं सर्व कुळें हळहळत, पण त्यांना बोलणार कोण ? त्यांची छत्री कुंपणांत दिसली कीं सर्व कुळें माना खालीं घालून कामें सुरू करीत. सर्वांना कमळेबद्दल वाईट वाटे. महारापोरांसुद्धां सर्वांची तिच्यावर भक्ति असे. हिंवानें आजारी पडलेल्या गावकऱ्यानें कमळेच्या हातचें कोरड्यास खाल्ल्या-शिवाय त्याच्या तोंडाला चव येत नसे. प्रेमळ व परोपकारी कमळा सर्वांना जेवूं घातल्याशिवाय स्वतः जेवत नसे. पावसांतून भिजून आलेल्या महाद्या गड्याला ती आपल्या वांटणीचा चहा देई. अवचित एखादा पाहुणा उभा राहिला तर उपाशी राही व पाहुण्याला जेवण वाढी. गोदू-ताईच्या चोरून ती मनीला दूध पाजी, त्यामुळें मनी सारखी तिच्या पायांत येऊन अंगाला खेटे. गोग्रासामुळें वाड्यांतलीं जनावरें देखील तिच्यावर प्रेम करीत. त्याचप्रमाणें ती माधवरावांच्या पूजेचें साहित्य भक्तिभावानें घासून पूजेची तयारी करी. एका गोदूताईशिवाय गांवांतील सर्वांचीं अंतः-करणें तिनें आपल्याकडे ओढून घेतलीं होतीं.

कमळेच्या जाचाच्या हकीकती तिच्या वडिलांच्या कानांवर गेल्या होत्या; पण त्यांनीं कमळेला विचारलें तर ती साफ जाच होतो हें नाकबूल करी; व वडीलसुद्धां त्यांचें घराणें जुन्या पद्धतीचें खानदानीचें असल्यामुळें आपल्या व्याह्यांना त्याबद्दल विचारण्याचें टाळीत. त्यांचें मत होतें, कीं मुलगी चांगल्या घरीं दिली, आतां ती आणि तिचें नशीब! जनक राजाचें अनुकरण करणारी तिची फुंकणी जशी तिच्या ओष्ठस्पर्शाच्या सुखाकरितां

अग्निप्रवेश करीत होती त्याप्रमाणें एक दिवस आपण व मदुसूदन आनंदाचे दिवस पाहूं या कल्पनेनं ती गोदूताईंचा जाच सहन करीत होती.

कमळेनें शरिराचा, कामाचा, पोटाचा जाच सहन केला; पण गोदूताई व लक्षुमबाई तिला ऐकूं जाईल अशा तऱ्हेनें तिच्या नक्की दिवसांचा सारखा खल करीत व कुचकुचत बसत. पहिल्या बाळंतपणाला सुनेला माहेरीं पाठविण्याची चाल आहे. पण त्यांनीं खऱ्याखोट्याची प्रचीति पाहण्याकरितां बाळंतपण सासरींच करण्याचें ठरविलें. आतां मात्र हा मानसिक त्रास कमळेला असह्य होऊं लागला. महिन्यांचा घोटाळा कसा झाला ? त्या अल्लड बालिकेला कांहींच सुचेना ! ती भांबावून गेली. भागीरथीबाईंना विचारावें तर मानी कमळेला असली गोष्ट परक्याला विचारण्याचा संकोच वाटला.

कमळा मराठी तिसरीपर्यंत शिकली होती. अखेर तिनें इकडच्या हकीकतीचें पत्र मधुसूदनला लिहिण्याचें ठरविलें. कुत्र्याचे पाय, मांजराचे पाय काढून तिनें पत्र पुरें केलें व महाद्याजवळ शेजारच्या कसब्याच्या गांवाला शाळेंत पोस्टऑफिस होतें त्यांत टाकण्यास दिलें. त्यानें पत्र आपल्या कानटोपींत ठेवलें. कारण त्याच्या अंगावर लंगोटी खेरीज दुसरें वस्त्र नसे. कानटोपींतच तो आपली ' इरीकारी ' ठेवीत असे.

गोदूताई पाळतीवर होत्याच. त्यांनीं विचारलें,

" महाद्या, कुठं चाललास ? "

" गांवांत जातों डोई करायला."

" टोपी घालून डोई करायाला चाललास ? पाहूं काय आहे टोपींत ? "

महाद्यानें मुकाट्यानें पत्र काढून दिलें. " खबरदार कमळेला सांगितलंस तर, नाहींतर साल बंद करीन तुझं. " गोदूताईनी महाद्याला दम दिला.

महाद्या बिचारा मुकाट्यानें निघून गेला.

पंधरा दिवस झाले. पत्राचें उत्तर नाहीं किंवा स्वतः मधुसूदनहि आला नाहीं ! तेव्हां कमळेनें विचारलें,

" महाद्या, पत्र नीट टाकलंस ना पेटींत ? "

" काय सांगूं बाई ! मला खोटं बोलतां येत नाहीं. त्या अवदसेनं काढून घेतलं. "

" अरे, मला कां बोलला नाहींस ? "

" तिनं मला दम दिला 'सांगू नको' म्हणून. आणि मी कोणत्या तोंडानं सांगूं तुम्हांला ? बाई, मला दुसरं पत्र लिहून द्या मी रातचं जाऊन पेटींत टाकतों आणि हलवतों पेटी. मग पाहतों, पत्र कसं जात नाहीं तें ? "

मधुसूदननें आपले पत्ते लिहिलेले पुष्कळ लिफाफे कमळेजवळ दिले होते. ते तिनें आपल्या ट्रंकेंत पैठणीच्या घडींत जपून ठेवले होते. तिनें पुन्हां एक सविस्तर हकीकतीचें पत्र लिहिलें. अलीकडे जाचाचा पारा वाढला होता, तेव्हां कोणतीहि गोष्ट न चोरतां तिनं स्पष्टपणें सगळें लिहिलें. महाद्यानें रातोरात पत्र पोस्टाच्या पेटींत कबूल केल्याप्रमाणें नेऊन टाकलें.

दोन दिवसांनीं कमळा सकाळीं दारांत उभी राहून मधुसूदनाच्या पत्राची वाट पाहूं लागली. मागें सांगितल्याप्रमाणें पोस्ट मास्तरचें काम करण्याबद्दल शाळामास्तरला पांच रुपये पोस्ट खात्याकडून मिळत. त्याच्या मदतीला एक पोस्टमन होता व त्याला कसब्याच्या गांवाखेरीज आजूबाजूच्या गांवांना पत्रें वांटावीं लागत. तो कंटाळा करून जवळच्या खेडेगांवांतून शाळेंत मुलें येत त्यांच्याबरोबर त्या त्या गांवचीं पत्रें देई. गोदूताईंना कमळा पत्राची वाट पाहते असा संशय आला व त्यांनीं मुलांना अर्ध्या वाटेंत गाठून त्यांच्याजवळून मधुसूदननें कमळेला पत्राचें उत्तर पाठवलें तें काढून घेतलें. अशा तऱ्हेनं मधुसूदनचीं कमळेला आलेलीं पत्रें काढून घेण्याचा त्यांचा हा पहिलाच प्रसंग नव्हता. त्या मधुसूदनचीं पत्रें नेहमीं फोडीत, गोठ्यांत जाऊन खुशाल वाचीत व प्रणयी जन एकमेकांना कसें काय लिहितात हें जाणण्याची हौस फेडून घेत. नंतर उघडलेलें पाकीट चांफ्याच्या चिकानें डकवून तें पत्र कमळेला आणून देत.

गोदूताईंनीं मधुसूदनचें पत्र उघडलें. त्यांत त्यानें कमळेला, कोणी घाणेरडा आळ घेत असेल तर त्याला भिण्याचें कारण नाहीं, पुष्कळ बायकांना गरोदरपणीं अशी संवय असते, असें लिहिलें होतें. त्याचें वैद्यकीय मत त्यानें खुलासेवार लिहिलें होतें. त्याची परीक्षा जवळ आली होती. घरच्या भानगडींमुळें तो जर नापास झाला तर तिला गोदूताईच्या कचाट्यांतून काढणें लांबणीवर पडणार होतें. तेव्हां वाटेल तें करून सहा महिने त्यानें तिला धीर धरण्यास लिहिलें होतें. गोदूताईंनीं पत्र वाचून पोटकुळीला लावलें व प्रथम महाद्या घोसाळीला ढाक घालीत होता त्याला गांठून त्याचा काढा काढला.

" मेल्या, निमकहराम होतोस होय ! सांग केव्हां पत्र टाकलस त. "

महाद्या त्या आग्यावेताळाच्या अवताराला घाबरला. त्यानें आपला अपराध कबूल केला व त्यानें पुन्हां तसें न करण्याचें कबूल केलें.

" मेल्या, सासुरवासणींना चहाड्या सांगतोस होय ? पुन्हां तर कर असं म्हणजे दाखवतें तुला ! कमळेनं पत्र दिलं तर मला आणून दे. आमच्या घराचा खेळखंडोबा करूं नकोस. आमच्या घरचं तूं अन्न खालं आहेस त्याला जाग आणि तिला चुगली करूं नकोस."

" मला कायबाय माहीत तुमची अशी भानगर आहे म्हणून ! आतां वहिनीबाईनीं पत्र दिलं कीं शाप तुमच्याकरं आनुन देईन. "

शाळेचीं मुलें गांवांत येऊन बराच वेळ झाला तरी कमळेला वाटत होतें पोस्टमन मागाहून येईल. म्हणून ती मधूनमधून दारांत जाऊन वाटेकडे डोळे लावी.

" काय ग, कशाची वाट पाहतेस ? मधुसूदन येणार आहे वाटतं ? आतां का तो तुला फसणार आहे ! त्याला काय, पुरुषाची जात ! एक घर उणं तर बीजघर पुणं" गोदूताईनीं कमळेच्या काळजालाच हात घातला.

कमळा पत्राची वाट पाहून दमली. एक दिवस गेला, दुसरा दिवस गेला, आठवडा गेला. कमळेला धीर निघेना. तिनें पुन्हां एक निर्वाणीचें पत्र लिहिलें. त्यांत " तुम्ही दोन दिवसांत आलां नाहींत तर मी जिवाचा घात करीन. कारण मला आतां हे अपमान सहन होत नाहींत. माझी अब्रू रोज चव्हाट्यावर मांडली जाते. " असें तिनें लिहिलें. पत्र पुरें करून तिनें महाद्याजवळ टाकण्यास दिलें. महाद्या घाबरला होता. त्यानें गोदूताईनीं सांगितल्याप्रमाणें तें पत्र त्यांच्याजवळ आणून दिलें.

पत्राची मुदत संपली, येण्याचा वायदा सरला तरी कमळा दारांत उभी राहून मधुसूदनची व पत्राची वाट पाहत होती. गोदूताई तिला जिव्हारीं जखमा करीतच होत्या. आतां तिला वाटूं लागलें कीं बायाजी म्हणतात त्याप्रमाणें मधुसूदननें आपल्याला टाकलें तर नसेल ना ? नाहीं तर ते स्वतः किंवा त्यांचें पत्र तरी यावयास पाहिजे होतें.

याप्रमाणें आठवडा गेला. कमळेचे डोळे कांहींतरी विचारानें तरंगूं लागले. विहिरीवर कळशी पाण्यांत बुडवतांना ती दहादहा मिनिटें रहाट

तसाच धरून पाण्याकडे पाही. याच विहिरींत मागें एका स्त्रीनें पावसाळ्यांत जीव दिला होता. पावसानें विहीर तुडुंब भरली होती. तेव्हां ती उपसणें शक्य नव्हतें व पाणी घाण झालें होतें. लोकांना त्यामुळें चारी महिने लांबच्या विहिरीवरून पाणी आणावें लागलें.

कमळेनें आपला बेत बदलला. घरांत कोणी नाहीं असें पाहून एके दिवशीं दुपारीं आपल्या कपडयांवर घासलेट ओतून घेतलें व काडी लावली. सर्व घरांत जाळ व धूर झाला. कांहीं वेळानें शेजारच्या एका घरांतील इसमानें जाळ पाहिला व त्यानें आरडाओरडा केला. लोकांनीं धांवाधांव करून तिचे कपडे चोळले. कमळा खूप होरपळून निघाली होती. तिच्या अंगावर भाजल्याचे खूप फोड उठले होते, त्यांच्या आगीनें ती तळमळूं लागली. तिला कशाचाहि स्पर्श सहन होत नव्हता. अखेर गारवा येण्याकरितां तिच्याच केळींचें कोवळें पान कापून त्याला मवारी लावून त्यावरतीं तिला निजवलें. माधवरावांनीं मधुसूदनला तार केली.

दुसरे दिवशीं सकाळीं अकरा वाजतां मधुसूदन आला. कमळेला देवखोलींत निजविलें होतें. तिच्या अंगावर शाल टाकली होती. दक्षिणेकडे वात केलेल्या समईकडे त्याचें लक्ष गेलें नाहीं. कमळेच्या गालावर हंसतांना जेथें खळया पडत तेथें नेमके दोन अश्रु चमकत होते—ते अश्रु नसून भाजल्याचे फोड होते.

मधुसूदननें स्टेथॉस्कोप काढला.

" कशाला काढतोस, बाळ ? " माधवराव बोलले.

मधुसूदननें स्टेथॉस्कोप पुन्हां खिशांत ठेवून दिला व तो खालीं बसला.

" काय झालं ? केव्हां गेली ?"

" रात्रीं बाराला. सारखी तुझी वाट पाहत होती. तिनें अंगावर घासलेट ओतून घेतलं. ही गोदी चांडाळीण तिच्या मरणाला कारण झाली !"

मधुसूदनच्या डोक्यांत प्रकाश पडला ! पण आतां काय उपाय ? उशीर, उशीर, फारच उशीर झाला ! जगाच्या दुष्टपणाकरितां केळीच्या पानावर काढून ठेवलेल्या त्या उताऱ्याकडे तो शून्य दृष्टीनें पाहत बसला !

पुणें, ४।९।१९३९.

---